दादा भगवान कथित

# आई-वडील आणि मुलांचा व्यवहार

(संक्षिप्त)



दादा भगवान कथित

# आई-वडील आणि मुलांचा व्यवहार

( संक्षिप्त )

मूळ गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन

अनुवाद : महात्मागण

**प्रकाशक** : अजित सी. पटेल
दादा भगवान आराधना ट्रस्ट,
दादा दर्शन, 5, ममतापार्क सोसायटी,
नवगुजरात कॉलेजच्या मागे, उस्मानपुरा,
अहमदाबाद - ३८० ०१४, गुजरात.
फोन - (०७९) ३९८३०१००

© All Rights reserved - Deepakbhai Desai
Trimandir, Simandhar City, Ahmedabad-Kalol Highway,
Adalaj, Dist.-Gandhinagar-382421, Gujarat, India.
No part of this book may be used or reproduced in any manner whatsoever without written permission from the holder of the copyright

**प्रथम आवृत्ति** : ३,००० ऑगष्ट, २०१४

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : **२५ रुपये**

**मुद्रक** : अंबा ओफसेट
पार्श्वनाथ चैम्बर्स, नव्या रिज़र्व बँके जवळ,
उस्मानपुरा, अहमदाबाद-३८० ०१४.
फोन : (०७९) २७५४२९६४

# त्रिमंत्र








नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो उवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो,

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं,

पढमं हवइ मंगलम् ॥१॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥२॥

ॐ नमः शिवाय ॥३॥

जय सच्चिदानंद



## दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित पुस्तके

### मराठी

१. भोगतो त्याची चूक
२. एडजेस्ट एव्हरीव्हेअर
३. जे घडले तोच न्याय
४. संघर्ष टाळा
५. मी कोण आहे ?
६. क्रोध
७. चिंता
८. प्रतिक्रमण
९. भावना सुधारे जन्मोजन्म
१०. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार
११. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार

### हिन्दी

१. ज्ञानी पुरूष की पहचान
२. सर्व दु:खों से मुक्ति
३. कर्म का सिद्धांत
४. आत्मबोध
५. मैं कौन हूँ ?
६. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
७. भूगते उसी की भूल
८. एडजस्ट एवरीव्हेयर
९. टकराव टालिए
१०. हुआ सो न्याय
११. चिंता
१२. क्रोध
१३. प्रतिक्रमण
१४. दादा भगवान कौन ?
१५. पैसों का व्यवहार
१६. अंत:करण का स्वरूप
१७. जगत कर्त्ता कौन ?
१८. त्रिमंत्र
१९. भावना से सुधरे जन्मोंजन्म
२०. प्रेम
२१. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य
२२. माता-पिता और बच्चों का व्यवहार
२३. दान
२४. मानव धर्म
२५. सेवा-परोपकार
२६. मृत्यु समय, पहले और पश्चात
२७. निजदोष दर्शन से... निर्दोष
२८. गुरु-शिष्य
२९. पति-पत्नी का दिव्य व्यवहार
३०. क्लेश रहित जीवन
३१. अहिंसा
३२. सत्य-असत्य के रहस्य
३३. चमत्कार
३४. पाप-पुण्य
३५. वाणी, व्यवहार में...
३६. कर्म का विज्ञान
३७. आप्तवाणी - १
३८. आप्तवाणी - २
३९. आप्तवाणी - ३
४०. आप्तवाणी - ४
४१. आप्तवाणी - ५
४२. आप्तवाणी - ६
४३. आप्तवाणी - ७
४४. आप्तवाणी - ८
४५. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (उत्तरार्ध)

★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती, हिन्दी आणि अंग्रेजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे. वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपणही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता.

★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित होत आहे.

## दादा भगवान कोण ?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. प्लेटफार्म नंबर तीनच्या रेल्वेच्या बाकावर बसलेले श्री. अंबालाल मुळजीभाई पटेल रुपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रगट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्भूत आश्चर्य! एका तासात विश्वदर्शन लाभले! आपण कोण ? भगवंत कोण ? जग कोण चालवत आहे ? कर्म म्हणजे काय ? मुक्ती कशाला म्हणतात ? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांचे संपूर्ण निराकरण केले! आणि जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांचा संपूर्ण उलगडा झाला. अशा प्रकारे निसर्गाने विश्वाला प्रदान केले एक अद्वितीय, संपूर्ण दर्शन आणि ह्याचे माध्यम बनले अंबालाल मूळजीभाई पटेल, जे होते गुजरातचे चरोतर जिल्ह्यातील भादरण गावचे पाटील, कंट्राक्टचा व्यवसाय करणारे आणि तरीही पूर्ण वीतराग पुरुष.

त्यांना ज्ञान प्राप्ति झाली त्याच प्रमाणे ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञान प्राप्ति करून देत होते, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्भूत ज्ञान प्रयोगाद्वारे. त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हणतात. अक्रम म्हणजे क्रमाशिवायचा आणि क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढायचे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण ?' ह्याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर ए.एम. पटेल आहेत. आम्ही ज्ञानीपुरुष आहोत आणि आत प्रगट झाले आहेत ते दादा भगवान आहेत. ते चौदलोकचे नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात बसलेले आहेत आणि 'इथे' संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! मी स्वत: परमेश्वर नाही. माझ्या आत प्रगट झालेले 'दादा भगवान' त्यांना मी पण नमस्कार करतो.''

व्यापारात धर्म असावा परंतु धर्मात व्यापार नसावा. ह्या सिद्धांताने ते संपूर्ण जीवन जगले. त्यांनी जीवनात कधीही कोणाकडूनही पैसे घेतले नाहीत, उलट स्वत:च्या व्यवसायातून झालेल्या फायद्यातून भक्तांना यात्रा करवीत असत.

## आत्मज्ञान प्राप्तिची प्रत्यक्ष लींक

मी तर, काही लोकांनां माझ्या हातून सिद्धि प्राप्त करून देणार आहे. माझ्या नंतर कोणी तरी पाहिजे की नाही! नंतर लोकांना मार्ग (दाखविणारा) हवा की नाही?

**- दादाश्री**

परम पूज्य दादाश्रींना जे ज्ञान प्राप्त झाले, ते अद्‌भुत आत्मज्ञान, त्यांनी देश-विदेश परिभ्रमण करून, दुसऱ्या लोकांना सुद्धा दोन तासात प्राप्त करून दिले होते, त्याला ज्ञानविधि म्हणतात. दादाश्रींनी आपल्या जीवनकाळातच पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा)यानां आत्मज्ञान देण्याची ज्ञानसिद्धि प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलय पश्चात् नीरूमा आतापर्यंत मुमुक्षुजनांना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ति, निमित्तभावाने करत होत्या. त्याचबरोबर पूज्य दीपकभाईनांही दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धि प्रदान केली होती. पूज्य नीरूमांच्या उपस्थितीतच त्यांच्या आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात कितीतरी ठिकाणी जाऊन मुमुक्षुंना आत्मज्ञान प्राप्ति करून देत होते, जे पूज्य नीरूमांच्या देहविलय पश्चात् आज पण चालू आहे.

ह्या आत्मज्ञान प्राप्ति नंतर हजारो मुमुक्षु संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळून सुद्धा मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव करत आहेत.

पुस्तकात लिहिलेली वाणी मोक्षार्थीला मार्ग दाखविण्याच्या हेतूने अत्यंत उपयोगी सिद्ध झाली आहे. परंतु मोक्ष प्राप्तिसाठी आत्मज्ञान प्राप्त करणे जरुरी आहे. अक्रम मार्ग द्वारा आत्मज्ञानाची प्राप्ति आज पण चालू आहे. त्यासाठी प्रत्यक्ष आत्मज्ञानीला भेटून आत्मज्ञानाची प्राप्ति करेल तेव्हाच हे शक्य आहे. प्रज्वलित दिवाच दुसरा दिवा प्रज्वलित करू शकतो.

# निवेदन

आत्मज्ञानी श्री अंबालाल मुळजीभाई पटेल, ज्यांना सर्वजण 'दादा भगवान'ह्या नावांने ओळखतात. त्यांच्या श्रीमुखातून आत्मतत्त्वासाठी जी वाणी निघाली, ती रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून ग्रंथरुपाने प्रकाशित करण्यात आली आहे. ह्या पुस्तकात परम पूज्य दादा भगवानांच्या श्रीमुखातून निघालेल्या सरस्वतीचा मराठी अनुवाद केला आहे. ह्यात त्यांचे उत्तम व्यवहारज्ञान आणि आत्मविज्ञान समाविष्ट आहे. सुज्ञ वाचकाने अध्ययन केल्यावर त्याला आत्मसाक्षात्काराची भूमिका निश्चित होते, असे कित्येकांचे अनुभव आहेत.

ते 'दादा भगवान' तर त्यांच्या देहात असलेल्या परमात्माला म्हणत होते. शरीर हे परमात्मा होवू शकत नाही. कारण शरीर विनाशी आहे. परमात्मा तर अविनाशी आहे आणि जे प्रत्येक जीवमात्रच्या आत आहे.

प्रस्तुत अनुवादामध्ये विशेष लक्ष ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला प्रत्यक्ष दादांची वाणीच, ऐकत आहोत असा अनुभव व्हावा.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थपणे अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा खरा उद्देश 'जसा आहे तसा' आपल्याला गुजराथी भाषेत अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचा खरा मर्म जाणायचा असेल, त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी, असा आमचा अनुरोध आहे.

अनुवादासंबंधी उणीवांसाठी आपले क्षमाप्रार्थी आहोत.

# समर्पण

अनादि काळापासून, आई-वडीलांचा व्यवहार;
राग-द्वेषाचे बंधन आणि ममतेचा मार!
न सांगू शके, न सहन करु शके, करावे तरी काय?
कोणास विचारु, कोण दाखवेल त्याचे खरे उपाय?
गोंधळलेले राम, दशरथ आणि श्रेणिकरसाखे राजाही;
श्रवणाच्या मृत्युवेळी किंकाळी निघाली आई-वडीलांची!
लग्नानंतर विचारतो 'गुरु' पत्नीला पदोपदी;
हया त्रिकोणात सुचे नाही काय करावे खरोखरी !
आजची मुले गोंधळात आई-वडीलांमुळे;
अंतर झाले मोठे, जनरेशन गॅप मुळे!
मोक्षाचे ध्येय, त्याने पार करावा संसार;
कोण बनणार सुकाणी, नाव आहे मझधार!
आतापर्यंतच्या ज्ञानीनी दर्शविले वैराग;
मुल-बाळ असलेले अडकले, कसे व्हायचे वीतराग?
दाखविले नाही कोणी संसारासह मोक्षमार्ग;
कलियुगाचे आश्चर्य दादांनी दिले अक्रममार्ग!
संसारात राहून सुद्धा होता येते वीतराग;
स्वत:हून दादांनी प्रज्वलित केले चिराग!
त्या चिरागाच्या रोशनीने मोक्ष पावतात मुमुक्षु;
खरे जिज्ञासु प्राप्त करतात नक्की येथे दिव्यचक्षु!
त्या रोशनीचे किरण प्रकाशित झाले ह्या ग्रंथात;
आई-वडील मुलांचा व्यवहार सरळ होतो मार्गात!
दिव्याने दिवा प्रज्वलित होतो प्रत्येकाच्या आत;
जगास सर्मपित हा ग्रंथ, प्राप्ति करा झपाट्यात!

❖ ❖ ❖

# संपादकीय

कोणत्या जन्मात अपत्ये झाली नाहीत? आई-वडीलांशिवाय कोणाचे अस्तित्व संभव आहे का? सर्व भगवंताने सुद्धा आईच्या पोटीच जन्म घेतले होते.अशा प्रकारे आई-वडील आणि मुलांचा व्यवहार अनादि अनंत आहे. हा व्यवहार कशा प्रकारे आदर्श व्हावा, त्यासाठी सर्वच रात्रंदिवस प्रयत्न करताना दिसतात. त्यातही ह्या कलियुगात तर प्रत्येक बाबतीत आई-वडील आणि मुलांच्यामध्ये जे मतभेद दिसून येतात, ते पाहून लोकांचा थरकाप उडतो. सत्युगामध्ये सुद्धा भगवान राम आणि लव-कुश यांच्यातील व्यवहार कसा होता? ऋषभदेव भगवाननांपासून वेगळा संप्रदाय चालवणारे मरीची सुद्धा होते च ना? धृतराष्ट्रची ममता आणि दुर्योधनची स्वच्छंदता अनोळखी आहे का? भगवान महावीरच्या काळामध्ये श्रेणिक राजा आणि पुत्र कोणीक मुघलांची आठवण करुन देतात की नाही? मोघल बादशाह जगप्रसिद्ध झाले, त्यावेळी एकीकडे बाबर होते की ज्यांनी हुमायुचे जीवन वाचविण्यासाठी आपले जीवन समर्पित करण्याची अल्लाजवळ प्रार्थना केली होती, तर दुसरीकडे शहाजहांला तुरुंगात टाकून औरंगजेब स्वतः राजगादीवर बसला होता. तर भगवान राम वडीलांसाठीच वनवासात गेले होते. श्रवणाने आई-वडीलांना कावडीमध्ये बसवून त्यांना तिर्थयात्रा घडवली (मुखपृष्ठ) असे राग-द्वेषाच्या झोक्यावर हेलकावे घेत आई-वडील आणि मुलांचा व्यवहार प्रत्येक काळात होता. वर्तमानात द्वेषाचा व्यवहार विशेष करुन पाहण्यात येत आहे.

अशा वेळी समतापूर्वक आर्दश व्यवहार करुन निघून जाण्याचे मार्ग अक्रम विज्ञानी परम पूज्य दादाभगवानां(दादाश्रीं)च्या वाणी द्वारे येथे प्ररुपित झाले आहे. आजच्या युवावर्गाची मानसिकता पूर्णपणे जाणून, त्यांना जिंकण्याचा मार्ग दाखवला आहे. परदेशस्त भारतीय आई-वडील आणि मुलांची, दोन देशामधील भिन्न भिन्न संस्कृतीमध्ये, जीवन जगण्याच्या कठीण समस्यांचे सुंदर निराकरण प्रसंगानुरुप बातचीत करुन सांगितले आहे. एक आदर्श जीवन जगण्यासाठी हे मार्गदर्शन वरिष्ठ वाचकांना आणि युवकवर्ग यांना खूप-खूप उपयोगी सिद्ध होणार.

प्रस्तुत पुस्तक दोन विभागात प्रकाशित होत आहे.

**पूर्वार्ध :** आई–वडीलांचा मुलांप्रति व्यवहार.

**उत्तरार्ध :** मुलांचा आई–वडीलांप्रति व्यवहार.

पूर्वाधात परम पूज्य दादाजींचे अनेक आई–वडीलांसोबत झालेल्या सत्संगांचे संकलन आहे. आई–वडीलांच्या अनेक मानसिक व्यथा दादाश्रींसमोर वळोवेळी व्यक्त झाल्या होत्या आणि त्यावर दादाश्रींने अचूक उपाय सांगितले आहे ज्यामुळे आई–वडीलांना स्वत:च्या व्यवहारिक समस्यांसाठी समाधान मिळतात. तसेच त्यांना आपले व्यवहारिक जीवन सुधारण्यासाठी किल्ल्याही मिळतात. त्या व्यतिरिक्त दैनंदिन जीवनात मुलांसोबत व्यवहार करताना येणाऱ्या अडचणींचेही अनेक समाधान प्राप्त होतात. जेणे करुन संसार व्यवहार सुखमय परिपूर्ण होवो. आई–वडील आणि मुलांमध्ये जे रीलेटीव संबध आहेत, तात्विक दृष्टिने ज्या ज्या वास्तविकता आहेत त्या सुद्धा ज्ञानी पुरुष समजावतात, जेणे करुन मोक्षमार्गावर पुढे जाण्यासाठी आई–वडीलांची मूर्छित अवस्था दूर होते व त्यांची जागृति उमलत जाते. हे सर्व काही पुस्तकाच्या पूर्वाधात संकलित करण्यात आले आहे.

आणि उत्तरार्धमध्ये परम पूज्य दादाश्रींचे लहान मुलं आणि तरुण मुला–मुलींसोबत झालेल्या सत्संगांचे संकलन आहे. ज्यात मुलांनी आपल्या जीवनातील व्यक्तिगत समस्यांवर समाधान प्राप्त केले आहेत. आई–वडीलांसोबत कशाप्रकारे व्यवहार करावा ह्याचीही उत्तम समज प्राप्त होत आहे. विवाह करण्या संबंधीही अशी उत्तम समज प्राप्त होत आहे की ज्या मुळे तरुणपिढी आपल्या जीवनात सत्य समजून व्यवहाराचे पूर्णपणे निराकरण करु शकेल. मुलांना आपल्या आई–वडीलांच्या सेवेचे महात्म्य आणि सेवा करण्याचा परिणाम समजावे ह्या साठी दिलेले मार्गदर्शन उत्तरार्धात समाविष्ट झाले आहे.

**– डॉ. नीरूबहन अमीन ह्यांचे जय सच्चिदानंद**

# प्रस्तावना

आई-वडील मुलांचा आहे व्यवहार;
अनंतकाळापासून, तरीही आले नाही पार!

मी वाढवले, मी शिकवले सांगू शकत नाही
तुम्हास कोणी शिकवले? तेव्हा काय म्हणाल?

अनिवार्य आहेत कर्तव्य सर्व मुलांप्रति;
तुझे ही करणारे होतेच ना तुझे वडील!

उगीच दटावून देऊ नको संताप;
मोठी होऊन मुले देतील तुला मनस्ताप!

अशी मुलं हवीत ही इच्छा तुम्ही करत;
स्वतः दोघे कसे भांडतात ते तर नाही बघत!

आई मुळा आणि बाप असेल गाजर !
मुलं सफरचंद कशी होतील खरोखर?

एका मुलाच्या संगोपनाची जबाबदारी;
भारताच्या पंतप्रधानाहून नक्कीच भारी!

तुझ्याहून अधिक पाहिली मी दिवाळी;
तुम्ही पाहिली पणतीत आम्ही तर वीजेत, मुले म्हणाली!

आई-वडीलांची भांडणे बिघडवते बालमानस;
गूंतागूंतीत मूले फसतात मानतात त्यांना बोगस!

धमकावून नाही समजत आजची मुले कधी;
प्रेमानेच होणार उज्जवल एकवीसावी सदी!

मारले, रागावले तरीही घटत नाही प्रेम जिथे;
प्रेमाच्याच प्रभावाने मुले होतात महावीर तिथे!

नवीन पिढी आहे हेल्दी माईन्डवाली;
भोगवादी असेल तरी नाहीत कषायवाली!

क्रोधाचा प्रतिघोष नाही विसरत मुले;
बापाहून वरचढ क्रोधी होतात मुले!

घरोघरी प्राकृतिक शेत होते सत्युगात;
निरनिराळ्या फूलांच्या बागा आहेत कलियुगात!

माळी बनाल तर बाग सुंदर शोभेल;
नाहीतर बिघडून कषायात डूबेल!

करु नये कधी मुलींवर शंका;
नाहीतर ऐका बरबादीचा घंटा!

वारसाहक्कात मुलांना देणार केवढे;
तुम्हाला मिळाले वडीलांकडून तेवढे!

जास्त द्याल तर करेल उधळपट्टी;
दारूड्या बनून काढेल तुझी खरडपट्टी!

कराल मुलांवर राग जितके;
बदल्यात होईल द्वेष तितके!

राग-द्वेषातून सुटण्यासाठी हो तु वीतराग;
भवपार होण्याचा बस हाच एक मार्ग!

मोक्ष हेतु, मुल नाहीत ते महापुण्यशाली!
घर नाही खाली पण वहीखाते आहे खाली.

कोणत्या जन्मात नव्हती अपत्ये?
आता तरी आवर, हो मुमुक्षु सच्चे.

आई-वडील मुलांचे संबंध आहे संसारी;
वारसाहक्काचे दिले नाही तर कोर्टात तक्रारी!

रागावले दोन तास तर तूटेल असा हा संबंध;
समजून जा आता हे तर स्मशानापूरते संबंध!

असत नाही कधी दृष्टीने सगळी मुले समान;
राग-द्वेषाच्या बंधनामुळे फरक पडतो देण्या-घेण्यात!

हिशोब फेडताना त्रासु नको कश्याशी;
समंजसपणे फेडून टाक नाहीतर आहे फाशी!

म्हणतात आईला तर सगळीमुले एकसमान;
नाही अहो ! राग-द्वेष आहे कर्म हिशोब प्रमाण!

एकच आई-वडीलांची मुले आहे वेग-वेगळी;
पाऊस आहे समान पण बी प्रमाणे रोपटी!

निसर्ग नियमाने एकत्र होतात एका घरात;
जुळत असलेले परमाणुच खेचले जातात!

एकत्र होतात द्रव्य-क्षेत्र-काळ आणि भाव;
घटना तेव्हा घडते हाच 'व्यविस्थतशक्ति' चा स्वभाव!

श्रेणिक राजाला तुरुंगात टाकले पोटच्या मुलाने;
मुलाला घाबरून स्वतः मेला हीरा चोखल्याने!

आत्म्याची नाही कोणी मुले;
सोडा माया सुधारा पुढचा जन्म!

❖ ❖ ❖

# अनुक्रमणिका

## आई-वडील आणि मुलांचा व्यवहार ( पूर्वार्ध )


| | |
|---|---|
| १. सिंचन, संस्काराचे..... | १ |
| २. कर्तव्याची गाणी काय गायची! | ७ |
| ३. नाही भांडायचे, मुलांच्या उपस्थितीमध्ये... | ९ |
| ४. अनसर्टिफाइड फादर्स एण्ड मदर्स! | १० |
| ५. समजावल्याने सुधरतात मुले | १७ |
| ६. प्रेमाने सुधारा चिमुकल्यांना | २१ |
| ७. 'विकृति' अशी सुटून जाईल | २४ |
| ८. नवीन जनरेशन, हेल्दी माईन्डची! | २९ |
| ९. आई-वडीलांच्या तक्रारी! | ३२ |
| १०. शंकांचे शूळ | ४८ |
| ११. वारसा हक्काप्रमाणे मुलांचे किती? | ५० |
| १२. मोहाच्या माराने मेलो अनेकदा | ५३ |
| १३. बरे झाले, नाही अडकलो संसारजाळ्यात.... | ५७ |
| १४. नाती, रिलेटीव की रिअल? | ६३ |
| १५. ते आहे घेणे-देणे, नातं नाही | ६४ |


## मुलांचा आई-वडीलांप्रति व्यवहार ( उतरार्ध )


| | |
|---|---|
| १६. 'टीनेजर्स' (तरुणपिढी) सोबत 'दादाश्री' | ६८ |
| १७. पत्नीची निवड | ७२ |
| १८. पती ची निवड | ८० |
| १९. जगामध्ये सुखाची साधना, सेवेने | ९६ |

# आई-वडील आणि मुलांचा व्यवहार
# ( पूर्वार्ध )

## १. सिंचन, संस्काराचे.....

**प्रश्नकर्ता :** येथे अमेरिकामध्ये पैसा आहे, परंतु संस्कार नाहीत आणि जवळपासचे वातावरणच असे आहे, तर त्यासाठी काय करावे ?

**दादाश्री :** प्रथम आई-वडीलांनी संस्कारी व्हायला पाहिजे. मग मुले बाहेर जाणारच नाहीत. आई-वडील असे असावेत की, त्यांचे प्रेम पाहुन मुले त्यांच्यापासून दूर जाणारच नाहीत. आई-वडीलांनी असे प्रेमळ असायला हवे. मुलांना जर सुधारायचे असेल तर तुम्ही जबाबदार आहात. मुलांसोबत तुम्ही कर्तव्यांनी बांधलेले आहात. तुम्हाला समजले की नाही ?

आपण मुलांना खूप उच्च प्रतिचे संस्कार द्यायला हवेत. अमेरीकामध्ये बरीच लोक सांगतात की आमची मुले मांसाहार करतात आणि असे बरेच काही करतात. तेव्हा मी त्यांना विचारले, 'तुम्ही मांसाहार करता का ?' तर म्हणाले, 'होय, आम्ही करतो' तेव्हा मी म्हणालो, तर मग मुले करणारच ना. आपलेच संस्कार ! आणि जरी आपण करत नाही तरी सुद्धा ते करतील, परंतु ते दुसऱ्या ठिकाणी जाऊन करतील. पण आपले कर्तव्य इतकेच की जर आपण त्यांना संस्कारी करायचे आहे तर आपण आपले कर्तव्य चुकायला नको.

आता मुलांकडे आपण लक्ष्य द्यायला हवे की, ते येथील असे-तसे जेवण खाणार नाहीत. आणि जर आपण खात असाल तर आता हे ज्ञान प्राप्त झाल्यानंतर आपण हे सर्व बंद केले पाहिजे. अर्थात् ते आपले संस्कार बघणार तसे करणार. पूर्वी आपले आई-वडील संस्कारी का म्हटले जात होते ? ते

खूप नियमवाले होते आणि तेव्हा त्यांच्यात संयम होता. आणि आजकालचे आई-वडील तर असंयमी आहेत.

**प्रश्नकर्ता :** ही सर्व मुले मोठी झाल्यानंतर त्यांना आम्ही धर्माचे ज्ञान कश्या प्रकारे द्यायला पाहिजे?

**दादाश्री :** आपण धर्मस्वरुप व्हायचे म्हणजे तेही होतील. आपल्यात जसे गुण असतील तसे मुले शिकतील. म्हणून आपणच धर्मिष्ठ होऊन जायचे. आपले पाहून पाहून शिकतील. जर आपण सिगारेट पीत असाल तर ते सुद्धा सिगारेट प्यायला शिकतील, आपण दारू पीत असाल तर ते सुद्धा दारू प्यायचे शिकतील. मांस-मटन खात असाल तर ते सुद्धा मांस-मटन खायचे शिकतील. जे आपण करीत असाल तसेच ते सुद्धा शिकतील. ते विचार करतील की, आम्ही यांच्यापेक्षा सवाई होऊ असे म्हणतील.

**प्रश्नकर्ता :** शिक्षणासाठी चांगल्या स्कूलमध्ये घातल्याने चांगले संस्कार नाही येत?

**दादाश्री :** परंतु ते सगळे संस्कार नाहीत. मुलावर तर आई-वडीलांशिवाय दुसरे कोणाचे संस्कार नाही येत. संस्कार आई-वडील आणि गुरु यांचेच. आणि थोडे-फार संस्कार त्याचे जवळपासचे लोक, मित्र मंडळी, संयोग ह्या सर्वांपासून मिळत असतात. तरी सगळ्यात जास्त संस्कार आई-वडील यांचेच! आई-वडील संस्कारी असतील तर ती मुले संस्कारी होतात, नाहीतर संस्कारी होणार च नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्ही मुलांना शिक्षणासाठी भारतात पाठवून दिले, तर आम्ही आमचे कर्तव्य चुकलो असे तर नाही होत ना?

**दादाश्री :** नाही, आपण चुकत नाही. आपण त्याचा सर्व खर्च द्यावा. तेथे अशा स्कूल आहेत की जिथे हिन्दुस्थानचे लोकं सुद्धा आपल्या मुलांना शिक्षणासाठी पाठवत असतात. खाणे-पिणे तेथे आणि राहण्याचे सुद्धा तेथेच, अशा बऱ्याचशा चांगल्या स्कूल आहेत!!

**प्रश्नकर्ता :** दादाजी, घर-संसार सर्व शांतीपूर्ण रहावे आणि अंतरात्माचे सुद्धा जतन व्हावे असे करुन द्या.

**दादाश्री :** घर-संसार सर्व शांतीपूर्ण रहावे एवढेच नाही, मुले सुद्धा आपले पाहून अधिक संस्कारी होवोत, असे होऊ शकते. हे तर सर्व आई-वडीलांना बिघडलेले पाहून मुले सुद्धा बिघडून गेली आहेत. कारण की, आई-वडीलचे आचार-विचार उपयुक्त नाहीत. पति-पत्नी सुद्धा, मुले बसलेले असतील तेव्हा मर्यादाहीन चाळे करीत असतात, ते पाहून मुले बिघडणार नाही तर काय होणार? मुलांवर कसे संस्कार पडतील? मर्यादा तर ठेवायला हवी ना? ह्या अग्निचा कसा प्रभाव आहे? लहान बाळ पण ह्या अग्निची भीती ठेवतो ना? आई-वडीलांचे मन फ्रॅक्चर झाले (तुटून गेले) आहे. मन विव्हळ होऊन गेले आहे. दुसऱ्यांना दुःखदायी होईल अशी वाणी बोलत असतात. त्यामुळे मुले बिघडून जातात. पत्नी अशी बोलत असते की पतीला दुःख होईल आणि पती असा बोलतो की पत्नीला दुःख होईल. हिन्दुस्थानाचे आई-वडील कसे असायला हवेत? पंधरा वर्षाच्या आतच ते मुलांना संस्कार घडवतात.

**प्रश्नकर्ता :** आता हा जो संस्कारचा स्तर आहे तो घसरत आहे. त्यामुळे ह्या सर्व समस्या आहेत.

**दादाश्री :** नाही, नाही. संस्कारच लुप्त होऊ लागले आहेत. याच्यात आता दादा मिळाले म्हणून पुन्हा मूळ संस्कार आणणार. सत्युगात होते, असे संस्कार पुन्हा आणणार. हिन्दुस्थानाच्या प्रत्येक मुलात संपूर्ण विश्वाचे ओझे उचलू शकेल एवढी भरपूर शक्ति आहे. फक्त त्याला पुष्टी देण्याची आवश्कता आहे. हे तर भक्षक निघालेत, भक्षक म्हणजे स्व-सुखासाठी दुसऱ्याला सर्व प्रकारे लूटायचे! ज्याने स्वतःच्या सुखाचा त्याग केला आहे. तोच दुसऱ्यांना सर्व सुख देऊ शकतो.

परंतु येथे तर शेठ पूर्ण दिवस फक्त लक्ष्मीच्याच विचारात रमलेले असतात. तेव्हा मला शेठजींना सांगावे लागते की, 'शेठ तुम्ही लक्ष्मीच्या मागे लागला आहात आणि इकडे घर उध्वस्त होत आहे!' मुलगी मोटारगाडी घेऊन एकीकडे जाते, मुलगा दुसरीकडे आणि शेठानी काही भलतीचकडे जाते! शेठजी तुम्ही तर सगळीकडून लूटले जात आहात!' तेव्हा शेठ विचारतात, 'मी काय करावे?' मी सांगितले, 'वस्तुस्थिती समजा आणि कशा प्रकारे जीवन जगायचे, हे समजा. केवळ पैशांच्या मागे पडू नका.

शरीराची काळजी घ्या. नाहीतर हार्टफेल होऊन जाईल. शरीराकडे लक्ष, पैशांकडे लक्ष, मुलींच्या संस्कारकडे लक्ष, सगळे कोपरे सांभाळायचे आहेत. तुम्ही फक्त एकच कोपरा सांभाळ-सांभाळ करीत आहात, आता बंगल्यातला एकच कोपरा साफ केला आणि बाकी सगळ्या जागेत कचरा पडून राहिला तर कसे वाटेल ? काने-कोपरे सर्वच साफ करायचे आहेत. ह्या रीतीने जीवन कसे जगता येईल ?' अर्थात् त्यांच्या बरोबर चांगले वर्तन ठेवा, मुलांना उच्च संस्कार द्या. त्यांना उच्च संस्कारी बनवा, आपण स्वतः तप करा, परंतु त्यांना संस्कारी बनवा.

**प्रश्नकर्ता :** आम्ही त्यांना सुधारण्यासाठी सर्व प्रयत्न करीत असतो, तरी सुद्धा ते नाही सुधारले तर मग आदर्श वडीलांनी ते प्रारब्ध समजून सोडून द्यायचे का ?

**दादाश्री :** नाही, पण तुम्ही तुमच्या रीतीने प्रयत्न करतात ना ? तुमच्या जवळ सर्टीफिकेट आहे ? मला दाखवा ?

**प्रश्नकर्ता :** आमच्या बुद्धीला जसे सुचते त्यानुसार प्रयत्न करतो.

**दादाश्री :** तुमची बुद्धी म्हणजे मी तुम्हाला सांगतो की, एक मनुष्य स्वतः न्यायाधीश, स्वतः गुन्हेगार आणि वकील सुद्धा स्वतः असेल, तर तो कसा न्याय करणार ?

अर्थात त्यांना कधीपण सोडून द्यायला नको. त्यांच्यावर नेहमी लक्ष ठेवले पाहिजे. सोडून दिले तर मग सर्व नष्ट होऊन जाईल.

लहान मूल आपले संस्कार घेऊनच येतात. परंतु त्याच्यात तुम्हाला मदत करुन त्या संस्कारांना रंग चढवण्याची आवश्कता आहे.

**प्रश्नकर्ता :** हो, असे करीत असतो, परंतु शेवटी त्यांना प्रारब्धावर सोडून द्यायचे का ?

**दादाश्री :** नाही, सोडू शकत नाही. असे सोडावे लागत असेल तेव्हा माझ्याकडे घेऊन या. मी ऑपरेशन करुन सुधारुन देईल. असे सोडू शकत नाही, धोका आहे.

एक लहान बाळ वडीलांच्या मिशा ओढत होता, तर वडील खुष झाले, आणि म्हणाले, वाह कसे बाळ आहे! बघा, माझ्या मिशा ओढतो! घ्या? आता त्याच्या असे बोलण्यावर लहान मुलगा मिशा पकडतो आणि परत परत ओढतो तरी पण ते काही बोलले नाही तर मग परिणाम काय होणार? म्हणून दुसरे काही नाहीतर बाळाला जरा चिमटा काढा, चिमटा काढल्यावर तो समजेल की हे चुकीची गोष्ट आहे. मी जे करतो आहे, 'ते वर्तन चुकीचे आहे.' असे त्याला कळेल. त्याला जास्त मारायचे नाही, फक्त हळूच चिमटा काढायचा.

वडीलांनी मुलाच्या आईला बोलविले, तेव्हा ती पोळ्या करीत होती, आई म्हणाली, 'काय काम आहे? मी पोळ्या करीत आहे.' 'तू इकडे ये, लवकर ये, लवकर ये लवकर ये!' आई पळत पळत येऊन विचारते, 'काय आहे?' तेव्हा वडील बोलतात, 'पहा, पहा, मुलगा किती हुशार झाला. पहा, पायांच्या टाचा उंचवून खिशातून पंचवीस रुपये काढले.' मुलगा हे पाहून विचार करतो की, 'अरे! मी आज खूप चांगले काम केले, असे काम मी आज शिकलो.' आणि नंतर तो चोर झाला, तर काय होणार? त्याला 'खिशातून पैसे काढणे चांगले आहे' असे ज्ञान प्रकट झाले होते. तुम्हाला काय वाटते? बोलत का नाही? असे करायला हवे?

असे चक्रम कुठून पैदा झालेत! ते बाप होऊन बसलेत! लाज नाही वाटत? त्या मुलाला कसे प्रोत्साहन मिळाले, हे कळते का? त्याला वाटले की खूप मोठा पराक्रम केला आहे. अश्याप्रकारे लूटले जाणे आपणांस शोभते का? काय बोलल्याने मुलांना 'एन्करेजमेन्ट' (प्रोत्साहन) मिळेल आणि काय बोलण्याने नुकसान होणार, एवढी समज तर असायला हवी ना? हे तर 'अनटेस्टेड फादर (अयोग्य पिता)' आणि 'अनटेस्टेड मदर (अयोग्य माता)' आहेत. बाप मुळा आणि आई गाजर, तर मग मुले सफरचंद थोडीच होणार?!

अर्थात कलियुगातल्या ह्या आई-वडीलांना असे सर्व जमत नाही आणि चुकीचे 'एन्करेजमेन्ट' देत असतात. काही तर त्याला सारखे उचलून फिरत असतात. पत्नी म्हणते, 'याला उचलून घ्या.' तर पती मुलाला उचलून घेतात. काय करणार? आणि जर तो कडक असेल आणि मुलाला उचलले

नाही तर पत्नी म्हणेल, 'काय माझ्या एकटीचा आहे? मिळून सांभाळायचे आहे.' असे तसे बोलली तर पतीला मुलाला उचलावेच लागते, सुटकाच नाही ना? जाणार कुठे? मुलांना उचलून-उचलून सिनेमा पहायला जाणे, घावपळ करणे. मग मुलांना संस्कार कशा प्रकारे मिळतील?

एका बँकेच्या मेनेजरने मला सांगितले, 'दादाजी, मी तर कधीही वाइफला की, मुलांना एक अक्षर सुद्धा बोलत नाही. काहीही चूक केली, काहीही केले तरी पण मी बोलत नाही.'

त्याला वाटले असेल की, दादाजी माझी खूप प्रशंसा करतील! तो काय अपेक्षा करत होता ते कळले का? पण मी त्याच्यावर खूप चिडलो, की तुम्हाला कोणी बँक मेनेजर बनविले? तुम्हाला मुल-बाळ सांभाळता येत नाही आणि पत्नीला सांभाळता येत नाही! तेव्हा तो तर घाबरुनच गेला बिचारा. उलट मी त्यांना सांगितले, 'तुम्ही अगदी शेवटच्या पायरीचे फालतु मनुष्य आहात! ह्या जगात तुम्ही काही कामाचे नाहीत!' तो माणूस मनामध्ये समजला असेल की मी असे सांगितले तर 'दादाजी' मोठे बक्षीस देतील. वेडपट, अरे, याचे काय बक्षीस द्यायचे असते? मूल चूकीचे करीत असेल तेव्हा त्याला आपण 'तू असे का केलेस? पुन्हा असे करु नकोस.' अशा तऱ्हेने नाटकीय पद्धतीने बोलायला पाहिजे. नाहीतर मूल असेच समजेल की तो जे काही करतो आहे ते 'करेक्ट' (बरोबर) च आहे, कारण की वडीलांना 'एक्सेप्ट' केले (स्विकारले) आहे. असे न बोलल्यामुळेच, घरात उद्रेक होतात. सर्व काही बोलायचे, पण नाटकीय पद्धतीने! मुलांना रात्री बसवून समजावयाचे, बातचीत करायची. घरातील सर्व कानाकोपऱ्यातला कचरा तर साफ करावाच लागेल ना? लहान मुलांना जरासे हलविण्याचीच गरज आहे. तसे संस्कार तर असतात, परंतु टकोर करावी लागते. त्यांना हलविण्यात काही गुन्हा आहे?

लहान मुलांना-मुलींना समजावायचे की सकाळी अंघोळ करुन भगवंताची पूजा करावी आणि रोज थोडक्यात बोलायला सागांयचे की, 'मला आणि सगळ्यांना, जगातल्या सर्वांना सद्‌बुद्धी द्या, जगाचे कल्याण करा.' एवढे बोलले तर त्यांना संस्कार मिळालेत, असे म्हटले जाईल आणि आई-वडील कर्मबंधनातून सुटतील. दुसरे, तुम्हाला मुलांनां 'दादा भगवानांचा

असीम जय-जयकार हो' दररोज बोलण्यास सांगायला पाहिजे. त्यामुळे हिन्दुस्थानातील मुले एवढी सुधारली गेली आहेत की सिनेमाला सुद्धा जात नाहीत. सुरुवातीला दो-तीन दिवस जरा कंटाळा करतील, परंतु मग दोन-तीन दिवसानंतर सर्व शांत, झाल्यावर आत त्याचा स्वाद उतरल्यावर, ते स्वत:च आठवणीने करतील.

## २. कर्तव्याची गाणी काय गायची!

स्वैच्छिक कार्याचे बक्षीस असते. परंतु एक भाऊ केलेल्या कर्तव्याचे बक्षीस शोधत होता! सर्व जग बक्षीस शोधत आहे की 'मी इतके काही केले, तुम्हाला काही कळत नाही का? तुम्हाला माझी किंमत नाही' अरे वेड्या कशाची किंमत शोधत आहेस, हे जे तु काही केले ते तर तुझे कर्तव्य होते तेच केलेस! एक माणूस स्वत:च्या मुलाबरोबर वाद घालत होता, तेव्हा मी त्याच्यावर रागवलो. तो म्हणत होता, 'कर्ज काढून मी तुला शिकविले. मी जर कर्ज काढले नसते तर तू शिकला असतास का? भटकत राहिला असता.' अरे, वेड्या, विनाकारण बडबडतोस कशाला? हे तर तुझे कर्तव्य आहे, असे बोलू नये. उलट हा मुलगा समंजस आहे. जर त्याने 'तुम्हाला कोणी शिकवले?' असे विचारले असते तर? तुम्ही त्याला काय उत्तर दिले असते? असे वेड्यासारखे बडबडत असतात ना लोक? अशिक्षित माणसं, भानच नाही. बेभान नुस्ती!

मुलांसाठी सर्व काही करायला हवे. परंतु मुलगा म्हणेल की, नाही बाबा आता पुरे झाले. तरी सुद्धा वडील सोडत नाही, तेव्हा काय करायचे? मुले लाल झेंडा दाखवतात तेव्हा तरी आपण समजायला हवे की नको? तुम्हाला कसे वाटते?

नंतर तो सांगेल, मला धंदा करायचा आहे. तर आपण व्यवसायासाठी काही तरी मार्ग करुन द्यायला हवा, पण मग याच्याहि पुढे जास्त खोलात शिरणारा बाप मुर्ख आहे. तो जर नोकरीला लागला असेल तर आपल्या जवळ जी जमा पुंजी असेल, ती गाठीशी ठेवून द्यायला हवी. एखाद्या वेळी मुलगा अडचणीत सापडला असेल तर हजार-दोन हजार पाठवून द्यायचे. परंतु हे तर सारखे त्याला विचारत असतात. तेव्हा मुलगा म्हणतो, 'तुम्हाला

नाही म्हणत असतो की माझ्या गोष्टींमध्ये ढवळाढवळ करु नका.' त्यावर हे वडील काय म्हणतात, 'अजून त्याला अक्कल नाही म्हणून असे बोलतो.' अरे, हे तर तुम्ही निवृत्त झालात! चांगलेच झाले. संसाराच्या जाळ्यातून मुक्त झालात!! मुलगा स्वतःहून च नाही म्हणतो आहे ना!

**प्रश्नकर्ता :** योग्य मार्ग कोणता? आम्ही तेथे मुलांना सांभाळायचे की स्वतःच्या कल्याणासाठी सत्संगमध्ये यायचे?

**दादाश्री :** मुले तर स्वतःहूनच सांभाळली जात आहेत. मुलांना तुम्ही काय सांभाळणार? आपले स्वतःचे कल्याण करुन घेणे हाच मुख्य धर्म आहे. बाकी, ही मुले तर सांभाळलेलीच आहेत ना! मुलांना काय तुम्ही मोठे करतात? बागेत गुलाबाची रोपे लावलीत तर रात्री वाढतात की नाही वाढत? पण आपण असे मानत असतो की माझे गुलाब, परंतु गुलाब तर हेच समजतो की मी स्वतःच आहे. मी कोणाचाही नाही. सगळे आपल्या स्वतःच्या स्वार्थने प्रेरित आहेत. हे तर आपण वेडा अहंकार करतो. वेडेपणा करतो.

**प्रश्नकर्ता :** जर गुलाबाला आपण पाणी दिले नाही तर ते कोमेजून जाणार?

**दादाश्री :** पाणी नाही दिले असे होतच नाही ना! मुलास चांगल्या प्रकारे ठेवले नाही तर ती चावायला धावतील अथवा ढेकूळ तरी मारतील.

म्हणून आता सांसारीक कर्तव्य बजावताना धर्म व कार्य यांचा समन्वय कशा प्रकारे साधता येईल? मुलगा जरी उलट उत्तर देत असेल तरी आपला धर्म न चुकवता कर्तव्ये बजावायची आहे. आपला धर्म काय? मुलाचे पालन-पोषण करुन मोठे करणे, आणि त्याला सत्‌मार्गावर चढवायचे. आता जर तो बरे-वाईट बोलत असेल आणि तुम्ही पण बरे-वाईट बोलाल तर काय होईल? तो बिघडत जाईल. त्यासाठी तुम्ही त्याला प्रेमाने समजावयाला पाहिजे की बैस बाळ, हे पहा, असे आहे, तसे आहे. अर्थात् सगळ्या कर्तव्यांसोबत धर्म व्हायलाच पाहिचे. धर्म नसेल तर त्या वेक्युममध्ये (रिकाम्याजागी) अधर्म येऊन बसेल. खोली रिकामी राहणार नाही. आता येथे आपण ही खोली रिकामी ठेवली असेल तर लोक कुलूप उघडून घूसून जातील की नाही घूसणार?

घरामध्ये स्त्रियांचा खरा धर्म कोणता? आजूबाजूच्या सगळ्या स्त्रियांना, पुरुषांना असे म्हणावे लागेल की व्वा! मानले पाहिजे ह्या बाईला. ही बाई अशी कर्तव्य निभावते की जवळपासचे सगळे खूष होऊन जातात. अर्थात् स्त्रियांचा खरा धर्म आहे की, मुलांचे पालन-पोषण करणे, त्यांना चांगले संस्कार देणे, पतीमध्ये संस्कारांची उणीव असेल तर संस्कार सिंचन करणे. आपले सर्व काही सुधारायचे, त्याचे नांव धर्म. सुधारावे नाही का लागत?

काही लोक तर काय करतात? भगवंताच्या भक्तिमध्ये तन्मयाकार राहतात. परंतु मुलाला पाहून ते चिडात. ज्यांच्या मध्ये प्रकट भगवंत आहेत अशा मुलांना पाहून ते चिडतात आणि तेथे भगवंताची भक्ति करतात, त्याचे नांव भगत! ह्या मुलांवर चिडायला हवे का? अरे! ह्यांच्यात तर प्रकट भगवान आहेत.

## ३. नाही भांडायचे, मुलांच्या उपस्थितीमध्ये...

जर आपण मांसाहार नाही करत, दारू नाही पीत आणि, घरामध्ये पत्नीसोबत भांडत नाही, तर मुले पाहतात की पप्पा खूप चांगले आहेत. दुसऱ्यांचे आई-वडील भांडण करीत असतात पण माझे आई-वडील भांडण करत नाही. एवढे पाहून तर मुले सुद्धा शिकतात.

पती दररोज पत्नीसोबत भांडतो तर मुले 'आ' करुन पाहतच राहतात. 'हे वडीलच असे आहेत' असे समजतात. कारण की मुलगा जरी लहान असला, तरी सुद्धा त्याच्यात न्यायाधीश सारखी न्याय करणारी बुद्धि आहे. मुलींमध्ये न्यायाधीश बुद्धि नसते. मुली कधीपण आईचीच बाजू घेत असतात. परंतु मुलगा तर न्यायाधीश बुद्धिवाला, जाणतो की वडीलांचाच दोष आहे! दोन-चार माणसांला वडीलांचे दोष सांगता-सांगता तो स्वत: निश्चय करतो की मोठा झाल्यावर दाखवून देईल! नंतर मग मोठा झाल्यावर तो तसे करतो सुद्धा. चांगल्याप्रकारे दाखवून देतो! घे तुझीच अनामत तुला परत!

म्हणून मुलांच्या उपस्थितीत भांडायचे नाही. आपण संस्कारी व्हायला हवे. तुमची चुक असेल तरी पण पत्नी म्हणेल, 'काही हरकत नाही.' आणि पत्नीची चुक असेल तर तुम्ही सुद्धा म्हणायचे, 'काही हरकत नाही.' मुले असे पाहतात तेव्हा तर ऑलराइट (चांगले) होत जातात. आणि जर

भांडायचेच असेल तर वाट पाहायची. जेव्हा मुले स्कूलमध्ये जातील तेव्हा तासभर भांडत बसा. परंतु मुलांच्या उपस्थितीत असे भांडण-मारामारी झाली तर मुले पाहातात आणि मग त्यांच्या मनात लहानपणापासून आई-वडीलांच्या बाबतीत विरोधी भावना तयार होते. त्याचा सकरात्मक भाव सुटून नकरात्मकता सुरु होते. अर्थात् आता तर मुलांना बिघडविणारे आई-वडीलच आहेत!

म्हणून आपल्याला भांडायचे असेल तर एकांतामध्ये भांडा, मुलांच्या उपस्थितीत नाही. एकांतामध्ये दरवाजा बंद करुन दोघे समोरासमोर भांडायचे तर भांडा.

महाग आंबे आणले आणि आमरसासोबत पोळ्या तयार करुन पत्नीने जेवायला वाढले आणि जेवणाची सुरुवात झाली. थोडे खाल्ले आणि पुढे जसे कढीत हात घातला आणि कढी जरा खारट लागली तर डाइनिंग टेबलवर ठोकून ओरडतो की, 'कढी खारट करुन टाकली आहे.' अरे! सरळ जेवण खाऊन घे ना! घराचा मालक ना, तेथे दुसरा कोणी त्याचा वरिष्ठ नाही. तो स्वतःच बॉस, म्हणून खरडपट्टी काढायला सुरु करतो. मुले बिचारी घाबरुन जातात की पप्पा असे वेड्यासारखे का झालेत? परंतु बोलू नाही शकत. कारण की मुले दबलेली आहेत, परंतु मनामध्ये अभिप्राय बांधून घेतात की, वाटते पप्पा वेडेच आहेत!

म्हणून मुले सगळी कंटाळून जातात. ते म्हणतात की फादर-मदर (आई-वडील) विवाहित आहेत, त्यांचे (व्यंगी) सुख पाहून आम्हाला कंटाळा आला आहे. मी विचारले, 'का? काय पाहिलेत?' तेव्हा मुले सांगतात की दररोजची कटकट, क्लेश बघून आम्ही समजून गेलो आहोत की लग्न केल्याने दुःख मिळते. म्हणून आता आम्हाला लग्नच करायचे नाही.

## ४. अनसर्टिफाइड फादर्स एण्ड मदर्स!

एक बाप सांगायचा, 'ही सगळी मुले माझ्या विरुद्ध झाली आहेत.' मी सांगितले, 'तुमच्यात बरकत नाही हे उघड झाले.' तुमच्यात बरकत असेल तर मुले विरोध कशाला करतील? म्हणून अशा प्रकारे आपली अब्रू उघडी करु नका.

आणि मुलांना दटावत राहिल्याने ती बिघडून जातात. त्यांना सुधारायचे असेल तर आम्ही त्यांना आमच्या जवळ बोलवून त्यांच्याशी अर्धातास बातचीत करतो, तेव्हा ते सुधरतात.

म्हणून मी पुस्तकात लिहले आहे की, 'अनक्वॉलिफाइड फादर्स एण्ड अनक्वॉलिफाइड मदर्स' ('योग्यता नसलेले आई-वडील.') तेव्हा मुले सुद्धा ही अशीच असतील ना! म्हणून मला सांगावे लागते की (योग्य) बाप होण्याच्या लायकीचे सर्टिफिकेट आधी मिळवा आणि मग लग्न करा.

यांना तर जीवन कसे जगायचे ते पण येत नाही. काही सुद्धा जमत नाही! संसार-व्यवहार कशा तऱ्हेने करायचा, हेच त्यांना जमत नाही. म्हणून मुलांना धोपटतात. अरे त्यांची धुलाई करायला ते काय कपडे आहेत, जो धुत असतो? मुलांना अश्या प्रकारे सुधारतोस, मार-पीट करुन, ही कुठली? पद्धत आहे? जसे की पापडचे पीठ रोंधतोस. मुसळीने पापडाचे पीठ रोंधतो त्याप्रकारे एका माणसाला स्वतःच्या मुलाला मार-पीट करतांना मी पाहिले होते.

आई-वडील त्यांना म्हणायचे की जरी मुलगा वाईट मार्गावर गेला असेल, तरी सुद्धा जेव्हा एका दिवशी आई-वडील म्हणतील, 'बेटा, हे आपल्याला शोभत नाही, हे तु काय केलेस?' त्यावर दुसऱ्या दिवशापासून सगळे वाईट मार्ग बंद करणार! असे प्रेमच कुठे आहे? हे तर प्रेम नसलेले आई-वडील! हे जग प्रेमानेच वश होते. आजच्या ह्या आई-वडीलांना मुलांवर किती प्रेम आहे? तर गुलाबाच्या रोपट्यावर माळीला जेवढे प्रेम असते तेवढे! त्यांना आई-वडील कसे म्हणायचे?

**प्रश्नकर्ता :** मुलांच्या शिक्षणासाठी किंवा संस्कारासाठी आपण कोणताही विचार नाही करायचा?

**दादाश्री :** विचार करण्यास हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** शिक्षण तर शाळेत होते परंतु घडवायचे कसे?

**दादाश्री :** घडविणे सोनारावर सोपवून द्यायचे, त्याचा घडविणारा त्याला घडवेल. मुलगा पंधरा वर्षाचा होईपर्यंत त्याला आपण सांगायचे, आणि तोपर्यंत आपल्याला जसे हवे तसे घडवायचे. नंतर मग त्याची पत्नी

त्याला घडवेल. मुलांना घडवण्यास जमत नाही तरी सुद्धा लोक घडवतच असतात ना? म्हणून तर चांगले घडवणे होत नाही. मुर्ति चांगली बनत नाही. नाक अडीच इंचाऐवजी साडे चार इंचाचे करुन टाकतात! नंतर मग मुलाची पत्नी येते, ती त्याच्या नाकाला कापून ठीक-ठाक करायला जाते. तेव्हा मुलगा पण तिचे नाक कापायला जातो. अशा प्रकारे मग ते दोघेही समोरा-समोर येतात.

**प्रश्नकर्ता :** 'सर्टिफाइडट' फादर-मदर ची व्याख्या काय आहे?

**दादाश्री :** 'अन्सर्टिफाइडट' आई-वडील म्हणजे स्वत:चा मुलगा स्वत:च्या म्हणण्यानुसार वागत नाही, स्वत:चा मुलगा स्वत:च्या आई-वडीलांचा आदर करत नाही, हैरान करतो! अशा आई-वडीलांना अन्सर्टिफाइड आई-वडील असेच बोलावे लागेल ना!

नाहीतर मुले अशी होतच नाहीत, मुले आज्ञाधारी असतात. परंतु आई-वडिलच धड नाहीत. जमीन अशी आहे, बीज असे आहे. म्हणून तर पीकात बरकत नाही! वरुन सांगतो की, 'माझी मुले महावीर होणार आहेत.' महावीर होतील का? महावीर ची आई तर कशी असावी!! वडील असा-तसा असला तरी चालेल, परंतु आई तर कशी असावी?!

यातील काही गोष्टी तुम्हाला आवडल्या?

**प्रश्नकर्ता :** ही गोष्ट आवडते त्यामुळेच तर त्याचा परिणाम झाल्याशिवाय रहातच नाही.

**दादाश्री :** बरेच लोक मुलाला म्हणतात की,'तू माझे सांगितलेले ऐकत नाही.' मी सांगितले, 'तुमची वाणी मुलाला आवडत नाही.' जर आवडली असती तर परिणमित झालीच असती. आणि वडील म्हणतात, 'तू माझे सांगितलेले ऐकत नाही.' अरे! तुला वडील होणे येत नाही. ह्या कलियुगात लोकांची स्थिती तर पहा! नाहीतर सत्‌युगात आई-वडील कसे होते!

मला हे शिकवायचे आहे की, तुम्ही अश्याप्रकारे बोला की मुलांना तुमच्या सांगण्यात इंटरेस्ट येईल. आणि तुम्ही सांगितल्या प्रमाणे करतीलच.

तुम्ही मला सांगितले ना की, माझे सांगणे तुम्हाला आवडते तर तुमच्याने सुद्धा एवढे होईलच.

**प्रश्नकर्ता :** आपल्या वाणीचा प्रभाव अश्याप्रकारे होत असतो की, जे कोडं बुद्धिने सोडवता येत नसते ते ह्या वाणी सुटते.

**दादाश्री :** हृदयस्पर्शी वाणी. हृदयस्पर्शी वाणीला तर मदरली (मातृत्वमयी) म्हटली जाते. हृदयस्पर्शी वाणीने जर काही वडील आपल्या मुलास बोलले, तर ते सर्टिफाइड फादर म्हटले जातील!

**प्रश्नकर्ता :** एवढे सहजपणे मुले ऐकत नाहीत.

**दादाश्री :** मग काय हिटलरिजम (जोर-जुलमाने) ने ऐकतात? हिटलरीजमने केले तर ते हेल्पफुल होत नाही.

**प्रश्नकर्ता :** ते ऐकतात, पण खूप समजावल्यानंतर.

**दादाश्री :** तरी हरकत नाही. तेही नियमाने आहे. खूप समजवावे लागते, त्याचे कारण काय आहे? की तुम्ही स्वतः समजलेले नाही, म्हणून जास्त समजवावे लागते. समंजस माणसाला तर एकदाच समजवावे लागते. हे आपण स्वतः समजायला नको? भले तुम्ही खूप समजावता पण त्यानंतर तरी ते समजतात ना?

**प्रश्नकर्ता :** हो समजतात.

**दादाश्री :** तर हा सर्वात चांगला मार्ग आहे. नाहीतर मारुन-मुटकून समजवायला जातात! कारण की बाप होऊन बसले आहेत ना, आणि ते समजतात की अजूनपर्यंत जगामध्ये कोणी बापच झाले नाही! म्हणून जे समजावून-उमजावून अशा प्रकारे वागतात, त्यांना मला अन-क्वॉलिफाइड नाही म्हणायचे.

वडीलांचा सद्-व्यवहार कसा असायला हवा? मुलांबरोबर दादागीरी तर नाहीच, परंतु सक्ती सुद्धा नको. त्यास वडील म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** मुलगा त्रास देत असले तर? मुलगा त्रास देत असेल तर वडील म्हणून काय केले पाहिजे? तरी तेथे सक्तीने वागयला नको?

**दादाश्री :** मुले वडीलांमुळेच त्रास देतात. वडीलांमध्ये नालायकी असेल तरच मुले त्रास देतात. ह्या जगाचा कायदा असाच आहे! बापात बरकत नसेल तर मुले त्रास दिल्याशिवाय राहत नाही.

**प्रश्नकर्ता :** मुलगा वडीलांचे सांगितलेले ऐकत नसेल तर काय करायचे?

**दादाश्री :** 'आपली चूक आहे' असे समजून सोडून द्यायचे! आपली चूक आहे तेव्हाच ऐकत नाहीत ना! वडील होता आले असते तर स्वत:चा मुलगा स्वत:चे ऐकत नाही असे झाले असते का? परंतु वडील होता आलेच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** एकदाचे वडील झाल्यावर मग पिल्ले (मुले) वडीलांना सोडतील का?

**दादाश्री :** सोडत असतील का? पिल्ले तर पूर्ण जीवनभर डॉग आणि डॉगीन ('कुत्रा' आणि 'कुत्री') दोघांकडे पाहातच असतात, की कुत्रा भो भो करतो आणि कुत्री त्याचे लचके तोडते. 'कुत्रा' भो भो केल्या शिवाय राहत नाही. पण शेवटी दोष त्या 'कुत्र्याचाच' निघतो. पिल्ले त्यांच्या आईच्याच बाजूने होतात. म्हणून मी एका माणसाला म्हणालो होतो, मोठी झाल्यावर ही मुले तुला मारतील, म्हणून बायकोबरोबर सरळ होऊन रहा! ही मुले तर त्यावेळी पाहातच असतात. त्यांची मजल पोहचत नाही तोपर्यंत आणि एकदा का त्यांनी मजल गाठली तर ते खोली बंद करुन मारतील. लोकांच्या बरोबर असे सुद्धा झाले आहे! मुलाने त्या दिवसापासूनच मनात नक्की केलेले असते की मोठे झाल्यावर मी वडीलांना परतफेड करेल. माझे काहीही होवो, परंतु त्यांना धडा शिकवणारच असे ठरवतो. हे सर्व सुद्धा समजण्यासारखे आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे सगळा दोष हा वडीलांचाच?

**दादाश्री :** हो, वडीलांचाच! दोष वडीलांचाच आहे. वडीलांमध्ये वडील होण्याची पात्रता नसेल, तर त्याची पत्नी सुद्धा त्याच्या विरुद्ध वागते. वडीलांमध्ये तशी योग्यता नसल्यामुळेच असे घडते ना! ते तर मग कसे बसे करुन समजून घेता. खूप मुश्किलीने संसार गाडा चालवतात. कुठपर्यंत समाजाच्या भीतीने भीत राहणार?

**प्रश्नकर्ता :** असेच असते का, की नेहमी वडीलांचीच चुक असते?

**दादाश्री** : वडीलांचीच चुक असते. त्याला वडील होता आले नाही, म्हणून हे सर्व बिनसले. घरामध्ये जर वडील व्हायचे असेल, तर त्याची स्त्री त्याच्याजवळ विषयासाठी भीक मागेल, अशी त्याची दृष्टी झाली तरच वडील होता आले असे होईल.

**प्रश्नकर्ता :** वडील घरामध्ये वडीलपणा राखत नाही, वडीलपणा राखत नाही तेव्हा त्याची चुक गणली जाते?

**दादाश्री :** तेव्हा तर सगळे काही ठीक होईल.

**प्रश्नकर्ता :** त्यानंतर तरी मुले वडीलांचे सांगितलेले ऐकतील, याची खात्री आहे का?

**दादाश्री :** आहे ना! आपले 'कॅरेक्टर' (चारित्र्य) चांगले असेल, तर सर्व जग कॅरेक्टरवाले (चारित्र्यवान) आहे.

**प्रश्नकर्ता :** मुले टुकार निघालीत तर त्यात वडील काय करणार?

**दादाश्री :** मुळ दोष वडीलांचाच असतो. तो का भोगतो आहे? पूर्वी सुद्धा आचरण बिघडलेलेच होते, त्यामुळे ही दशा झाली ना? ज्याचे स्वत:च्या आचरणावरचे कंट्रोल (अंकुश) कोणत्याही जन्मामध्ये बिघडलेले नसेल तर त्याच्यासोबत असे घडत नाही, हे मी सांगू इच्छितो! पूर्वकर्मे कशी झालीत? मुळातच आपले कंट्रोल नव्हते तेव्हा ना! म्हणजे आम्ही कंट्रोलमध्ये मानतो. कंट्रोल मान्य करण्यासाठी तुम्हाला त्याचे सर्व नियम समजून घ्यायला हवे. ही मुले आपला आरसा आहेत. आपल्या मुलांवरुन कळते की आपल्यात किती चूका आहेत!

जर आपल्यात शील नांवाचा गुण असेल तर वाघ सुद्धा आपल्याला वश होतो. तर मुलांची काय मजल? आपल्यातच शीलचा ठिकाणा नसल्यामुळे, ही सगळी भानगड आहे. शील समजलात ना?

**प्रश्नकर्ता :** शील कोणाला म्हणायचे? त्याच्या बाबतीत जरा विस्ताराने सर्वांना समजेल अशा प्रकारे सांगा ना!

**दादाश्री :** कोणालाही किंचित्-मात्र दुःख द्यावे असा मनात भाव नाही. आपल्या शत्रूला सुद्धा दुःख पोहचविण्याचा भाव व्हायला नको. त्याच्यात 'सिन्सियारिटी' (निष्ठा) असावी, 'मोरालिटी' (नैतिकता) असावी, सर्व गुण समाविष्ट असावेत. किंचित्-मात्र हिंसक भाव नसेल तर तो 'शीलवान' म्हटला जातो. तेथे वाघ सुद्धा शांत होऊन जातो.

**प्रश्नकर्ता :** आजकालचे आई-वडील असे सर्व कुठून आणतील?

**दादाश्री :** तरी सुद्धा त्यातले थोडे फार, निदान पंचवीस टक्के तरी पाहिजे की नाही? परंतु आपण ह्या काळामुळे आईस्क्रीम चे कप खात राहतो असे होऊन गेलो आहोत.

**प्रश्नकर्ता :** वडीलांचे चारित्र्य कसे असायला हवे?

**दादाश्री :** मुले दररोज म्हणतील की, पप्पा आम्हाला बाहेर करमतच नाही. तुमच्यासोबत खूपच चांगले वाटते. असे चारित्र्य असायला हवे.

**प्रश्नकर्ता :** हे तर उलट होत असते, वडील घरात असतील तर मुले बाहेर जातात आणि वडील बाहेर गेले तर मुले घरात असतात.

**दादाश्री :** मुलांना पप्पांशिवाय करमत नाही असे असायला हवे.

**प्रश्नकर्ता :** तर तसे होण्यासाठी पप्पांनी काय करायचे?

**दादाश्री :** मला मुले भेटतात ना, त्या मुलांना माझ्याशिवाय करमत नाही. म्हातारे भेटतात, तर त्यांना पण माझ्या शिवाय चांगले वाटत नाही. युवक भेटतात, तर त्यांना पण माझ्या शिवाय चांगले वाटत नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्हाला सुद्धा आपल्या सारखे व्हायचे आहे.

**दादाश्री :** होय, जर तुम्ही सुद्धा माझ्या सारखे करणार तर तसे होऊन जाणार. तुम्ही म्हणणार, 'पेप्सी आण.' तर तो सांगेल, 'नाही आहे' तरी काही हरकत नाही, मग पाणी घेऊन ये. पण तुम्ही तर तेव्हा म्हणाल, 'पेप्सी का आणून ठेवला नाही?' तर ही झाली भानगड मग. आम्ही तर दुपारची जेवण्याची वेळ झाली असेल आणि आतून सांगितले की, 'आज जेवण नाही बनविले' तर मी म्हणतो की, 'ठीक आहे, मग पाणी आण थोडे पिऊन

घेतो, बस झाले ''तू स्वयंपाक का नाही केलास?' असे बोलणारे फौजदार होऊन जातात. तेथे असे फौजदारी करायला लागतात.

## ५. समजावल्याने सुधरतात मुले

असे कटकट करण्याऐवजी मौन राहिलेले चांगले, न बोलणे चांगले. मुले सुधरण्याऐवजी बिघडतात, म्हणून एक शब्द सुद्धा बोलायचा नाही. मुले बिघडल्याची जबाबदारी आपली आहे. ही समजण्यासारखी गोष्ट आहे ना?

आपण सांगतो की असे करु नको तेव्हा तो उलटच करतो. 'मी करणारच जा, तुम्हाला जे काही करायचे ते करा.' हे तर अजून जास्त बिघडवतात! मुले आपली अब्रू मातीत मिसळवतात. ह्या भारतीयांना जीवन जगणे सुद्धा आले नाही! वडील होणे जमले नाही तरी वडील होऊन बसलेत. म्हणून मला असे-तसे करुन समजवावे लागते, पुस्तके प्रकाशित करावी लागतात. नाहीतर ज्यांनी आपले ज्ञान घेतले आहे, ते तर मुलांना खूप चांगले घडवू शकतात. मुलाला जवळ बसवून, डोक्यावर हात फिरवून विचारायचे की, 'बेटा तुझ्याकडून ही चुक झाली आहे, असे नाही का वाटत!'

तर इन्डियन फिलोसॉफी (भारतीय तात्त्विक समज) कशी असते? आई-वडीलांपैकी एक जण रागावत असेल तर दुसरा मुलाची बाजू घेतो. म्हणून तो जर सुधरत असेल, तर सुधरायचे राहिले बाजूला, वरुन मुलगा काय समजतो की 'आई चांगली आहे आणि पप्पा वाईट आहेत, मोठा झाल्यावर मी त्यांना मारील.'

मुलांना सुधारायचे असेल तर आमच्या आज्ञेनुसार चला. मुलांनी विचारले तरच बोलायचे आणि त्याना सांगून पण टाकायचे की मला नाही विचारले तर उत्तम. मुलांच्या बाबतीत उलट विचार आलेत तर लगेच त्याचे प्रतिक्रमण करुन टाकायचे.

कोणाला सुधारायची शक्ति ह्या काळात संपून गेली आहे. म्हणून सुधारण्याच्या अपेक्षा सोडून द्या. कारण की मन-वचन-काया यांची एकात्मता असेल तरच समोरचा सुधरु शकतो. मनात जसे आहे तसे वाणीतून निघाले आणि तसेच वर्तनमध्ये असेल तरच समोरचा सुधरेल.

हल्लीच्या काळात तसे नाही आहे. घरामध्ये प्रत्येकासोबत कसा व्यवहार असावा त्याची 'नॉरमालिटी' (सर्वसामान्य परिस्थिती) आणली पाहिजे. आचार, विचार आणि उच्चार यामध्ये चांगला फेरफार झाला तर स्वतः परमात्मा बनु शकतो आणि त्याच्या उलट विपरीत बदल झाला तर राक्षस सुद्धा होऊ शकतो.

लोक समोरच्याला सुधारण्यासाठी सर्व काही फ्रेक्चर करुन टाकतात. प्रथम स्वतः सुधरा मगच दुसऱ्याला सुधारु शकाल. परंतु स्वतः सुधरल्याशिवाय समोरचा कसा सुधरेल?

आपण मुलांसाठी भावना करीत राहायचे की मुलांची बुद्धि चांगली होवो. असे करता करता खूप दिवसानंतर परिणाम आल्या शिवाय राहणार नाही. ते तर हळू–हळू समजेल, तुम्ही भावना करीत राहा. त्यांच्यावर सक्ती करणार तर उलट बिघडतील. म्हणून जेम तेम करुन संसार निभावून घेण्यासारखा आहे.

मुलगा दारू पिऊन येतो आणि तुम्हाला दुःख देतो, तेव्हा तुम्ही मला सांगाल की हा मुलगा मला खूप दुःख देत असतो. तर मी सांगेल की चुक तुमची आहे, म्हणून शांतपणे, गप्प राहून भाव न बिघडवता सहन करुन घ्या. हा भगवान महावीरांचा नियम आहे आणि जगाच्या लोकांचा नियम तर वेगळा आहे. जगातले लोक सांगतील की 'मुलाची चुक आहे.' असे सांगणारे तुम्हाला येऊन भेटतील आणि तुम्ही सुद्धा ताठ होणार की, 'मुलाचीच चुक आहे, माझी समज तर बरोबर आहे.' मोठे आले समजवाले! भगवान म्हणतात, 'चुक तुझी आहे.'

तुम्ही मुलांसोबत फ्रेन्डशिप (मित्रता) केली तर ते सुधरतील. तुमची फ्रेन्डशिप असेल तर मुले सुधरतील. परंतु आई–वडीलांसारखे रहाल, रूबाब करायला जाल, तर धोकाच आहे. फ्रेन्ड (मित्र) सारखे रहायला पाहिजे. जेणे करुन बाहेर फ्रेन्ड शोधणारच नाहीत, अशा प्रकारे रहायला पाहिजे. जर तुम्ही फ्रेन्ड आहात, तर त्याच्या बरोबर खेळायला हवे. फ्रेन्ड सारखे सगळे करायला पाहिजे! तू आल्यानंतर आम्ही चहा पिणार, असे सांगायला हवे. आपण सगळे एकत्र बसून चहा पिऊ. तुमचा मित्र आहे अशा प्रकारे वर्तन

करायला पाहिजे तेव्हा मुले तुमची बनून रहातील. नाहीतर मुले तुमची बनून राहणार नाहीत. खरे तर मुले कोणाची नसतातच. एखादा मनुष्य मरुन गेला, त्याच्या मागे त्याचा मुलगा मरतो का कधी? सगळे घरी येऊन खातात-पितात. ही मुले, मुले नाही आहेत. हे तर फक्त निसर्गनियमाच्या आधारे तसे दिसते एवढेच. 'युवर फ्रेन्ड' (तुझा मित्र) सारखे रहायला पाहिजे. तुम्ही प्रथम नक्की केले तर फ्रेन्ड सारखे राहू शकता. जसे मित्रला वाईट वाटेल असे बोलत नाही, तो उलट करीत असेल तरी आपण मित्राला कुठपर्यंत समजावत असतो? तर तो मान्य करेल तोपर्यंत आणि नाही मान्य केले तर शेवटी त्याला सांगतो की, 'जशी तुझी इच्छा!' आणि मनामध्ये फ्रेन्ड बनण्यासाठी सुरुवातीला काय करायला पाहिजे? बाह्य व्यवहारामध्ये मी त्याचा वडील आहे, परंतु आत मनामध्ये आपण मानले पाहिजे की मी त्याचा मुलगा आहे. तेव्हाच फ्रेन्डशिप होणार! नाहीतर नाही होणार? वडील फ्रेन्ड कसे बनतील? त्याच्या लेवल (पातळी) ला आलो तरच. त्या लेवलला कशा प्रकारे यायचे? तर मनामध्ये असे मानायचे की 'मी त्याचा मुलगा आहे.' जर असे म्हटले तर काम फत्ते होणार. बरेच लोक असे म्हणतात, आणि त्यांचे काम होऊन जाते!

**प्रश्नकर्ता :** आपण सांगता की मुले सोळा वर्षाची झाल्यानंतर फ्रेन्ड बनायचे, परंतु सोळा वर्षापूर्वी पण त्यांच्यासोबत फ्रेन्डशिपच ठेवायची का?

**दादाश्री :** तसे असेल तर खूपच चांगले. परंतु दहा-अकरा वर्षापर्यंत आपण फ्रेन्डशिप ठेऊ शकत नाही. तोपर्यंत त्याच्याकडून चुक-भूल होत असते. म्हणून त्याला समज द्यायला हवी. एखादी चापट पण मारावी लागते, दहा-अकरा वर्षापर्यंत. तो वडीलांची मिशी ओढत असेल तर चापट पण मारावी लागते. जे बाप बनायला गेलेत ना, ते मार खाऊन मेलेत.

प्रत्येकाने आपल्या मुलांना सुधारण्यासाठी सगळे प्रयत्न करायला हवे. परंतु प्रयत्न सफळ व्हायला हवेत. बाप झालात पण मुलांना सुधारण्यासाठी बापपणा सोडता येईल का ? 'मी बाप आहे' हे सोडणार का?

**प्रश्नकर्ता :** पण तो जर सुधरत असेल तर अहम् भाव, द्वेष, सर्व सोडून त्याला सुधारण्याचा प्रयत्न करायला पाहिजे?

**दादाश्री :** तुम्हाला बाप असल्याचे भाव सोडावा लागेल.

**प्रश्नकर्ता :** 'हा माझा मुलगा' असे मानायचे नाही आणि 'मी वडील आहे' असेही मानायचे नाही?

**दादाश्री :** तर त्याच्या सारखा दुसरा नियमच नाही.

माझ्या प्रेमळ स्वभावामुळे अशी दोन-चार लोकं मला प्रेमाने 'दादा' म्हणायचे. इतर सगळे तर 'दादा केव्हापासून आलात?' असे वरकरणी विचारायचे. मी सांगायचो परवा आलो. तद्-नंतर काहीच नाही, दिखावटी नमस्कार! परंतु ते तर रेग्युलर नमस्कार करायचे. मी शोधून काढले की त्यांनी मला 'दादा' म्हटले तेव्हा मीही मनातून त्यांना 'दादा' म्हणायचे, अर्थात् प्लस-मायनस (बेरीज-वजावाकी) करायचो, भेद उडवायचो. मी त्यांना मनातून दादा म्हणायचो त्यामुळे माझे मन खूप चांगले रहायला लागले, हलके वाटायला लागले. तसे तसे त्यांना 'अट्रेक्शन' (आकर्षण) जास्त व्हायला लागले.

मी त्यांना मनापासून दादा मानायचो म्हणून त्यांच्या मनापर्यंत माझे सांगणे पोहचत होते ना! त्यांना वाटायचे ओहोहो! माझ्यावर किती प्रेमभाव आहे. ही खूप समजण्यासारखी गोष्ट आहे. अशी गोष्ट केव्हा तरी निघते. तर हे तुम्हाला सांगतो. तुम्हाला जर असे करता आले तर कल्याण होऊन जाईल असे आहे. मग काय केले? असा व्यवहार नेहमी चालायलाचा म्हणून त्यांच्या मनामध्ये असेच वाटायचे की दादा सारखा कोणी माणूस कुठेही मिळणार नाही.

**प्रश्नकर्ता :** वडील असे विचार करतात की मुलगा मला एडजस्ट (अनुकूल) का होत नाही?

**दादाश्री :** हे तर त्यांच्या वडीलपणा आहे म्हणून बेभानपणा आहे. वडीलपणा म्हणजे बेभानपणा, धनीपणा हे बेभानपणा जेथे 'पणा' शब्द आला तेथे बेभानपणाच आला.

**प्रश्नकर्ता :** उलट बाप असे म्हणतो की मी तुझा बाप आहे, तू का माझे ऐकत नाहीस? माझा मान ठेवत नाहीस?

**दादाश्री :** एकाला तर मी असे बोलताना ऐकले होते 'तुला माहित नाही की मी तुझा बाप आहे ते!' कश्यातऱ्हेचे चक्रम जन्मले आहेत? हे सुद्धा बोलावे लागते? जे ज्ञान प्रगटपणे सर्व जगाला माहित आहे, ते सुद्धा बोलण्याची वेळ आली आहे?

**प्रश्नकर्ता :** दादा, याच्या पुढचा डायलोग (संवाद) सुद्धा मी ऐकला आहे की तुम्हाला कोणी सांगितले होते की आम्हाला जन्माला घाला!

**दादाश्री :** असे म्हणाला तर आपली अब्रू काय राहिली मग?

## ६. प्रेमाने सुधारा चिमुकल्यांना

**प्रश्नकर्ता :** त्यांची चुक होत असेल तर टोकावे तर लागेल ना?

**दादाश्री :** तेव्हा आपण त्याला असे विचारले पाहिजे की, हे तू जे काही करत आहे, ते तुला योग्य वाटते का? तू ते सर्व विचारपूर्वक केलेस ना? तेव्हा तो सांगेल की मला योग्य वाटत नाही. तर आपण सांगायचे की बाळ, मग आपण उगीच असे का करायचे? असे तुम्ही स्वतः विचारपूर्वक सांगा ना! सगळे स्वतः न्यायाधीशच आहेत, सर्वजण समजतात, चुकीचे होत आहे, हे स्वतः मुले सुद्धा जाणतातच ! परंतु तुम्ही त्याला, 'तू मूर्ख आहेस, गाढव आहेस, तू असे का केलेस?' असे बोललात तर तो उलट हट्टाला पेटतो, काही नाही, 'मी करतो आहे तेच बरोबर आहे जा.' असे म्हणून उलटे करेल. तेव्हा मग घर कसे चालवायचे ते ही जमत नाही. जीवन कसे जगायचे ते जमत नाही. म्हणून जीवन जगण्याच्या सगळ्या युक्त्या येथे दिलेल्या आहेत की, कशाप्रकारे जीवन जगायचे ते?

समोरच्याचा अहंकार जागृत होणारच नाही. आमचा आवाज सत्तायुक्त नसतो. अर्थात् सत्ता असायला नको. मुलांना तुम्ही काहीही सांगा पण आवाज सत्तायुक्त नसला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** संसारात रहात असताना किती तरी जबाबदाऱ्या पार पाडाव्या लागतात, आणि जबाबदाऱ्या पार पाडणे हा एक धर्म आहे. हा धर्म बजावताना अकारण वाणी बोलावी लागली तर ते पाप की दोष आहे?

**दादाश्री :** असे आहे ना, की कटू वाणी बोलताना आपला चेहरा

कसा होऊन जातो? गुलाबाच्या फुलासारखा? नाही? तर आपला चेहरा बिघडला की समजायचे पाप लागले. आपला चेहरा बिघडेल अशी वाणी निघाली तर समजायचे पाप लागेल. कटू वाणी बोलू नका. थोडे शब्द बोला परंतु हळू आवाजात समजावून सांगा. प्रेम ठेवा, तेव्हा एक दिवस जिंकू शकाल. कटूताने जिंकू शकणार नाही. उलट तो विरोधात जाईल आणि उल्टे कर्म बांधेल. तो मुलगा उलटे परिणाम येईल असे कर्म बांधेल. 'आता तर मी लहान आहे म्हणून असे दटवतात, परंतु मोठे झाल्यावर मी बघून घेईन.' असे अभिप्राय आत बांधत राहतो. अर्थात असे करु नका, त्याला समजवा. एक दिवस प्रेम जिंकेल. दोनच दिवसात त्याचे फळ येणार नाही. दहा दिवस, पंधरा दिवस, महिन्यापर्यंत त्याच्यासोबत प्रेमाने रहा. मग पहा, ह्या प्रेमाचा परिणाम काय येतो, हे पहा तर!

**प्रश्नकर्ता :** आम्ही बऱ्याचदा समजावले परंतु तो समजत नाही तर काय करायचे?

**दादाश्री :** समजावण्याची आवश्कता च नाही. प्रेम ठेवा. तरी सुद्धा आपण हळूवार त्याला समज देत रहा. आपल्या शेजाऱ्यांशी सुद्धा आपण असे कटु वचन बोलतो का कधी?

जसे विस्तवाला आपण काय करतो? चिमट्याने पकडतो ना ? चिमटा ठेवतो ना? आणि जर असाच हातात विस्तव पकडला तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** चटका लागेल.

**दादाश्री :** म्हणून चिमटा ठेवावा लागतो.

**प्रश्नकर्ता :** मग कोणत्या प्रकारचा चिमटा ठेवायला पाहिजे?

**दादाश्री :** आपल्या घरातील एक माणूस चिमट्यासारखा आहे, तो स्वत: जळत नाही आणि समोरच्या जळालेल्याला पकडतो, आपण त्याला बोलावून सांगितले पाहिजे की, 'भाऊ, मी जेव्हा याच्याशी बोलेल तेव्हा तू मला साथ दे.' त्यानंतर तो सर्व ठीक करुन देईल. काहीतरी मार्ग काढायला हवा. नुसत्या हातानेच विस्तव पकडायला गेलात तर काय होईल?

आपले बोलणे फळत नसेल तर आपण गप्प राहिले. आपण मूर्ख आहोत, आपल्याला बोलायला जमत नाही, तर मग गप्प बसले पाहिजे. एक तर आपले बोलणे फळत नसेल आणि उलट आपले मन बिघडेल आत्मा बिघडेल. असे कोण करणार?

**प्रश्नकर्ता :** आई-वडील आपल्या मुलांसाठी जी ओढ दाखवतात, त्यावेळी बऱ्याचदा असे वाटते की हे अति होत आहे.

**दादाश्री :** ते सर्व इमोशनल (भावूक) आहे. कमी दाखवणारा सुद्धा इमोशनल आहे. नोर्मल (सामान्य) असायला पाहिजे. नोर्मल म्हणजे फक्त बनावटी, 'ड्रामेटिक'. जसे नाटकातील स्त्रीसोबत नाटक करतात, तेव्हा ते वास्तविक, एक्जेक्ट असते. लोकांना खरेच वाटत असते. परंतु बाहेर आल्यानंतर तो कलाकर तिला सांगेल की 'चल माझ्या सोबत?' तर ती सोबत जाणार नाही, म्हणेल की ते तर नाटकापूरतेच होते. हे समजले ना?

ह्या जगाला सुधारण्याचा मार्गच प्रेम आहे. जगातील लोक ज्याला प्रेम म्हणतात ते प्रेम नाही, ती तर आसक्ति आहे. ह्या बेबीवर प्रेम करतात, परंतु ती ग्लास फोडेल तेव्हा प्रेम राहते का? तेव्हा तर चिडतात तिच्यावर, म्हणून ती आसक्ति आहे.

मुले प्रेम शोधत असतात, परंतु प्रेम त्यांना मिळत नाही, म्हणून त्यांच्या समस्या तेच जाणतात, सांगू ही शकत नाही, आणि सहनही होत नाही. आजच्या तरुणासांठी माझ्याकडे मार्ग आहे. ह्या जहाजाची धुरा कशा प्रकारे सांभाळायची, त्याचे मार्गदर्शन मला आतून मिळते. माझ्या आत असे प्रेम उत्पन्न झाले आहे की जे कधी वाढत नाही आणि घटत ही नाही. वाढणे-घटणे त्याला आसक्ति म्हणतात. जे वाढत नाही आणि घटत ही नाही ते परमात्म प्रेम आहे. म्हणून तर कोणताही माणूस वश होतो. मला कोणाला वश करायचे नाही, तरी सुद्धा प्रेमाने सगळे वश होत असतात. ज्याला खरे प्रेम म्हणतात ना, ते तर पहायला सुद्धा मिळत नाही. जगाने प्रेम पाहिलेच नाही. कधीकाळी ज्ञानी पुरुष अथवा भगवंत असतील तेव्हा प्रेम पाहू शकतात. प्रेम कमी-जास्त नाही होत, अनासक्ति असते. हेच प्रेम. ज्ञानींचे प्रेम हेच परमात्मा आहे.

लहान मुलांच्या सोबत आमचे खूप जमते. माझ्याबरोबर फ्रेन्डशिप (मित्रता) करतात. आता मी जेव्हा आत येत होतो ना, तेव्हा एक एवढासा मुलगा होता, तो मला घ्यायला आला आणि म्हणाला 'चला. येथे आल्याबरोबर घ्यायला आला. आमच्या सोबत फ्रेन्डशिप करतात. तुम्ही लाड करतात. आम्ही लाड नाही प्रेम करतो.'

**प्रश्नकर्ता :** हे जरा समजवा ना दादाजी, लाड करणे आणि प्रेम करणे. हे सर्व उदाहरण देऊन समजवा.

**दादाश्री :** अरे, एका माणसाने तर स्वतःच्या मुलाला दाबले, असे छातीवर! दोन वर्षांपासून त्याला भेटला नव्हता आणि उचलून असे दाबले! तेव्हा ते मुल खूप दाबले गेले, त्याच्याकडे काही पर्याय उरला नाही, म्हणून शेवटी त्याने बापाला चावला. ही काय रीत आहे? ह्या लोकांना तर बाप होणे सुद्धा नाही जमत!

**प्रश्नकर्ता :** आणि प्रेमवाला असेल, तो काय करतो?

**दादाश्री :** हो, तो त्याच्यावर प्रेमाने हात फिरवतो, गालावर हात फिरवतो, असा पाठीवर हळूच थोपडतो. असे-तसे करुन खुश करतो. नाहीतर काय त्याला असे दाबून टाकायचे? मग तो बिचारा गुदमरला तर चावणारच ना! श्वास कोंडला गेला तर चावणार नाही?

आणि मुलांना कधी मारु नका. जर काही चुक-भूल झाली तर अवश्य समजवा, हळूवार डोक्यावर हात फिरवून त्याला जरुर समजवा. प्रेम दिले तर मुले समंजस होतात.

## ७. 'विकृति' अशी सुटून जाईल

ड्रिंक्स (दारू) वगैरे काही घेता का?

**प्रश्नकर्ता :** कधीतरी जेव्हा घरामध्ये भांडण होत असते तेव्हा. हे मी खरे बोलतो आहे.

**दादाश्री :** ते बंद करुन टाका. त्यामुळे लाचार होऊन गेलात. आपल्याला हे नाही चालणार, हे नाही पाहिजे. घेऊच नकोस. स्पर्श सुद्धा

करु नकोस तू, दादाची आज्ञा आहे, म्हणून अश्या वस्तूंना स्पर्श करायचाच नाही. तरच तुमचे जीवन चांगले व्यतीत होईल. कारण की, आता तुला त्याची आवश्कता वाटणार नाही. हे चरणविधि इत्यादि वाचणार तर तुला त्याची गरज पडणार नाही आणि भरपूर आनंद राहील, खूप आनंद राहील. समजले ना? समजले की नाही?

**प्रश्नकर्ता :** व्यसनांपासून मुक्त कशा प्रकारे राहायचे?

**दादाश्री :** व्यसनांपासून मुक्त होण्यासाठी 'व्यसन वाईट वस्तु आहे.' अशी आपली प्रतीति झाली पाहिजे. ही प्रतीति ढिली पडता कामा नये. आपला निश्चय डगमगायला नको, असे असेल तर मनुष्य व्यसनांपासून दूरच राहतो. पण 'त्यात काही हरकत नाही.' असे बोलल्याबरोबर व्यसन अजून पक्के होते.

**प्रश्नकर्ता :** बऱ्याच काळापासून कोणी दारू पीत असेल किंवा ड्रग्स (नशीले पदार्थ) घेतले असतील, तर सांगतात की त्याचा परिणाम त्याच्या मेंदूवर झालेला असतो. त्यामूळे तो नशा बंद करतो तरी पण त्याचा परिणाम तर राहतोच. तर त्या परिणामांपासून मुक्त होण्यासाठी दादा आपण काय सांगाल? कशा प्रकारे बाहेर पडायचे, त्यासाठी काही मार्ग आहे?

**दादाश्री :** नाही, परंतु नंतर परत रिएक्शन येते त्याची. जे परमाणू आहेत ते सगळे शुद्ध झाले पाहिजेत ना! आता तर प्यायचे बंद करुन दिले आहे ना? मग आता त्याचे काय करायचे आहे? 'दारू पिणे वाईट आहे' असे नेहमी बोलत राहायचे. होय, सोडल्यानंतर सुद्धा असे बोलत राहायचे. परंतु चांगली आहे असे कधीच बोलू नये. नाहीतर पुन्हा त्याचा परिणाम होणार.

**प्रश्नकर्ता :** दारू प्यायल्याने मेंदूवर कशा प्रकारचे नुकसान होत असते?

**दादाश्री :** त्यामुळे भान हरपते ना, त्यावेळी आतील जागृति वर आवरण येत असते. नंतर नेहमीसाठी ते आवरण हटत नाही. मनात आपल्याला वाटते की ते निघून गेले, परंतु निघत नाही, असे करता करता आवरण येऊन, येऊन मग.... माणसावर जडत्व येते. नंतर मग त्याला चांगले

विचार सुद्धा येत नाहीत. पण जी माणसं डेवलप (विकसित) झालेली आहेत, त्यांचा मेंदू ह्यातून बाहेर पडल्या नंतर खूप चांगला डेवलप होत जातो! त्याला मग पुन्हा बिघडवायचे नाही.

**प्रश्नकर्ता :** दारू प्यालामुळे मेंदुला जे काही डॅमेज (नुकसान) झाले आहे, मेंदूचे परमाणू डॅमेज झालेले आहेत, तर तो डॅमेज झालेला भाग पुन्हा रिपेअर कशा प्रकारे होईल?

**दादाश्री :** त्यावर काही उपाय नाही. ते तर काही काळानंतर हळू-हळू होईल. प्यायल्या शिवायचा जो काळ जाईल, तस तसे निरावरण होत जाईल. लगेच होणार नाही. दारू आणि मांसाहार यांच्यामुळे जे नुकसान होत असते, दारू आणि मांसाहारपासून जे सुख भोगतो, ते सुख 'रिपे' (परतफेड) करतांना त्याला पशुयोनीमध्ये जावे लागते. हे जेवढे काही सुख तुम्ही घेता त्याला 'रिपे' करावेच लागेल, अशी जबाबदारी आपल्याला समजायला हवी. हे जग पोकळ ढोल नाही आहे. ते तर चुकते करावेच लागेल असे जग आहे. फक्त ह्या आंतरिक सुखाचे 'रिपे' करावे नाही लागत! इतर सर्व बाहेरचे सुख 'रिपे' करावे लागते. जेवढे आम्हाला जमा करायचे असेल ते करा पण मग ते परतफेड तर करावे लागेल!!

**प्रश्नकर्ता :** येणाऱ्या जन्मामध्ये पशू होऊन 'रिपे' करावे लागेल, ते तर बरोबर आहे. परंतु ह्या जन्मामध्ये काय होणार? ह्या जन्माचे काय परिणाम आहे?

**दादाश्री :** ह्या जन्मामध्ये त्याला स्वत:वर आवरण येतात म्हणजे जड सारखे, पशू सारखाच झालेला असतो. लोकांमध्ये 'प्रेस्टिज' (अब्रु) रहात नाही, लोकांमध्ये सन्मान रहात नाही, काही सुद्धा रहात नाही.

अंडी असो की पिल्लू असोत दोन्ही एकच आहेत. कोणाचे अंडे खाणे आणि कोणाचे पिल्लू खाणे ह्यात फरक नाही. पिल्लू खाणे तुला पसंत आहे? दुसऱ्यांचे पिल्लू खाणे आवडेल?

**प्रश्नकर्ता :** अंड्यांमध्ये सुद्धा शाकाहारी अंडी असतात अशी लोकांची मान्यता झाली आहे.

**दादाश्री :** नाही, ही तर चुकीची मान्यता आहे. ज्या अंड्यांना निर्जीव अंडी म्हणतात, ती जीवरहित वस्तू आहे. ज्याच्यात जीव नाही, ती वस्तू खाऊ शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** ही गोष्ट वेगळीच वाटते, कृपया विस्ताराने समजवा ना!

**दादाश्री :** वेगळी म्हणजे, एक्झेक्ट (तंतोतंत) गोष्ट आहे. हे तर शास्त्रज्ञांनी सुद्धा सांगितलेले आहे की निर्जीव वस्तू कधीच खाऊ शकत नाही, जीवीत वस्तूच खाल्ली जाते. ज्यात जीव असतो परंतु वेगळ्या प्रकारचा जीव, पण तेव्हा लोकांनी त्याचा गैरफायदा करुन घेतला. अरे त्याला तर स्पर्श सुद्धा करायला नको. मुलांना अंडे खाऊ घातल्यामुळे काय होते? शरीर इतके विकारी आवेशमय होऊन जाते की मग त्यांच्या नियंत्रणात रहात नाही. आपले 'व्हेजेटेरियन फूड' (शाकाहारी जेवण) तर खूपच उत्कृष्ठ असते, भले कच्चे असो. डॉक्टरांचा यामध्ये दोष नाही. डॉक्टर तर त्यांची स्वत:ची समज आणि बुद्धिच्या आधारे सांगतात. आपल्याला आपल्या संस्कारांचे रक्षण तर करायला हवे ना! आपण संस्कारी घरातले लोक आहोत.

**प्रश्नकर्ता :** अमेरिकेत दादांनी किती तरी मुलांना एकदम 'टर्न' (बदल) करुन दिलेत.

**दादाश्री :** होय, त्यांचे आई-वडील तक्रार घेऊन आले होते की आमची मुले बिघडत चालली आहेत, त्यांचे काय करायचे? मी सांगितले, 'तुम्ही केव्हा सुधरलेले होता की मुले बिघडून गेली आहेत! तुम्ही मांसाहार करता?' तेव्हा ते म्हणाले, 'होय, कधी कधी.' 'दारू पिता का?' तर म्हणाले 'कधी कधी' म्हणूनच ह्या मुलांना वाटते की माझे वडील करतात म्हणजे ही हितकारी वस्तु आहे. जे हितकारी असेल तेच माझे वडील करतील ना? अर्थात् असे करणे तुम्हाला शोभत नाही. मग त्या मुलांना मांसाहारातून सोडवले. त्या मुलांना विचारले की 'तू हा बटाटा कापू शकतो का? ही पपई कापू शकतो का? हे 'एप्पल' कापू शकतो का?' 'होय, सर्व कापू शकतो.' मी सांगितले, 'भोपळा एवढा मोठा असला तर?' 'होय, त्याला सुद्धा कापू शकतो' 'काकडी एवढी मोठी

असेल ती सुद्धा कापू शकतो.' 'त्यावेळी 'हार्ट' वर परिणाम होईल?' तेव्हा म्हणाला,'नाही होणार.' नंतर मी विचारले, 'बकरी कापू शकतोस?' तेव्हा म्हणाला,'नाही.' कोंबडी कापू शकतोस? तेव्हा म्हणाला, 'नाही, माझ्याने नाही कापली जाणार.' म्हणून तुझे हार्ट कापण्यास 'एक्सेप्ट' (स्विकार) करेल, तेवढ्याच वस्तू तू खायच्या. तुझे हार्ट एक्सेप्ट नाही करत, हार्टला पसंत नाही, रुचत नाही त्या वस्तू नाही खायच्या. नाहीतर त्याचा परिणाम विपरीत होईल आणि ते परमाणू तुझ्या हार्टवर परिणाम करतील. तेव्हा मुले सर्व काही चांगल्या प्रकारे समजली आणि मांसाहार सोडून दिला.

एक प्रसिद्ध लेखक 'बनार्ड शॉ' यांना कोणी तरी विचारले, 'तुम्ही मांसाहार का नाही करत?' तेव्हा ते म्हणाले, 'माझे शरीर कब्रस्तान नाही आहे, हे कोंबडा-कोंबडीचे कब्रस्तान नाही आहे.' परंतु त्यात काय फायदा? तेव्हा ते म्हणालेत, 'आई वॉन्ट टू बी ए सिविलाइज्ड मेन.' (मला सुसंस्कृत मनुष्य व्हावयाचे आहे.) तरी सुद्धा करतात, क्षत्रियांना हा अधिकार आहे. परंतु त्यांच्यात क्षत्रियता असेल तर अधिकार आहे.

**प्रश्नकर्ता :** ह्या लहान मुलांना मगस (एक प्रकारची जास्त तुपातली मिठाई) खाऊ घालत असतात, ती खायला देऊ शकतो का?

**दादाश्री :** नाही खायला द्यायची, मगस नाही खायला द्यायचे. लहान मुलांना मगस, डिंकपाक, पक्वान्न अशी मिठाई खायला द्यायची नाही. त्यांना साधे जेवण द्यायचे आणि दूध पण कमी द्यायला हवे. मुलांना हे सर्व द्यायला नको. आपले लोक तर दूधापासून केलेल्या वस्तू सारखे-सारखे खायला देत असतात. अरे! अश्या वस्तू खाऊ घालायच्या नाही. उत्तेजना वाढेल आणि बारा वर्षाचा झाल्याबरोबर त्याची दृष्टी बिघडेल. उत्तेजना कमी होईल असे जेवण मुलांना द्यायला हवे. हे सर्व तर माहित च नाही. जीवन कसे जगायचे, याची समजच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे, आम्हाला काही बोलायचे नाही, परंतु समजा की आमचा मुलगा चोरी करीत असेल तर त्याला चोरी करु द्यावी का?

**दादाश्री :** दाखवण्यासाठी विरोध करा, पण आतमध्ये समभाव ठेवा. बाहेर दिसण्यास विरोध आणि तो चोरी करतो आहे, त्यावर निर्दयता किंचित्-पण होऊ देउ नका. जर आतील समभाव तूटुन गेला तर निर्दयता होईल. सर्व जग निर्दय होत असते.

त्याला समजवा की 'ज्याची चोरी केली, त्याचे असे प्रतिक्रमण करायचे आणि प्रतिक्रमण किती वेळा केले ते मला सांगायचे, तर मग ठीक होऊन जाईल. यापुढे तू चोरी करणार नाही याबद्दलची प्रतिज्ञा कर. पुन्हा चोरी करणार नाही आणि जी केली गेली त्याची क्षमा मागतो. अशाप्रकारे सारखे-सारखे समजावल्यामुळे हे ज्ञान पक्के होऊन जाते. त्यामुळे पुढच्या जन्मी चोरी नाही करणार. हा तर फक्त इफेक्ट (परिणाम) आहे, दुसरे नवीन आम्ही शिकवायचे नाही. तर मग नवीन उभे राहणार नाही.

हा मुलगा आमच्या जवळ सगळ्या चूका कबूल करतो. चोरी केली ती सुद्धा कबूल करतो. आलोचना तर गजब पुरुष असेल तेथेच होऊ शकते. जर असे सर्व झाले तर हिन्दुस्थानाचा आश्चर्यकारक परिवर्तन होऊन जाईल!

## ८. नवीन जनरेशन, हेल्दी माईन्डची!

**दादाश्री :** रविवारी तुमच्या जवळपासच सत्संग होत असतो, तर का येत नाही?

**प्रश्नकर्ता :** रविवारच्या दिवशी टी.व्ही. पाहायचा असते ना, दादाजी!

**दादाश्री :** टी.व्ही आणि तुमचा काय संबंध? हा, चष्मा लावला आहे तरी सुद्धा टी.व्ही. पहाता? आमचा देश असा आहे की टी.व्ही. पहावा लागत नाही, नाटक पहावे लागत नाही, ते सर्व येथल्या येथे रस्त्यावर होत असते ना!

**प्रश्नकर्ता :** या वाटेवर पोहचलो तेव्हा बंद होईल ना?

**दादाश्री :** कृष्ण भगवान गीतेमध्ये सांगून गेले की मनुष्य वेळ वाया घालवत आहेत. कमवण्यासाठी नोकरीला जाणे अनर्थ म्हटले जात नाही. जोपर्यंत ती दृष्टी नाही मिळत तोपर्यंत ही दृष्टी सुटत नाही.

लोक सुद्धा पशू सारखे अंगावर घाणेरडा चिखल केव्हा चोपडतात?

तर जेव्हा त्यांना जळजळते तेव्हा. हे टी.व्ही, सिनेमा, सगळे घाणेरडा चिखला सारखे आहेत. या सर्वांतून काहीही सारतत्त्व निघत नाही. आमचा टी.व्ही. ला काहीही विरोध नाही आहे. प्रत्येक वस्तू पाहण्याची सूट आहे परंतु एकीकडे पाच वाजून दहा मिनिटला टी.व्ही चा कार्यक्रम असेल व दुसरीकडे सत्संग असेल, तर काय आवडेल? अकरा वाजता परीक्षा असेल आणि अकरा वाजता जेवायचे असेल तर काय निवडणार? अशी समज असायला पाहिजे!

**प्रश्नकर्ता :** रात्री उशीरापर्यंत टी.व्ही पहात असतात, म्हणून मग झोपतच नाही ना?

**दादाश्री :** परंतु टी.व्ही तर तुम्ही विकत आणला तेव्हा पाहतात ना? तुम्हीच ह्या सगळ्या मुलांना बिघडवले आहे. ह्या आई–वडीलांनीच मुलांना बिघडवले आहे, वरुन टी.व्ही आणतात घरात! अगोदरच काय कमी तुफान होते, त्यात पुन्हा एकाची भर?

नवीन पॅन्ट घालून आरश्यात सारखे पहातात. अरे, आरश्यात काय पहातो आहे? ही कोणाची नक्कल करतात ते तर समजा! अध्यात्मवाल्यांची नक्कल केली की भौतिकवाल्यांची नक्कल केली? जर भौतिकवाल्यांची नक्कल करायची असेल तर त्यासाठी ते आफ्रिकावाले आहेत, त्यांची नक्कल का नाही करीत? परंतु हे साहेबासारखे दिसण्यासाठी, नक्कल करतो. पण तुझ्यात काही बरकत तर नाही! कसला साहेब होऊन फिरतोस? पण तो तर साहेब होण्यासाठी असे आरश्यामध्ये पहातो, केस वळवतो आणि समजतो की आता मी 'ऑलराइट' झालो. आणि पॅन्ट घालून मागून थोपडथापड करीत फिरत असतो. अरे, उगीच कशाला थोपडथापड करतोस? कोणीही बघणार नाही. सगळे आपआपल्या कामात व्यस्त आहे. सगळे आपआपल्या चिंतेत आहेत.

तुला पहाण्यासाठी कोण रिकामा बसला आहे? सगळे आपआपल्या विवंचनेत पडलेले आहेत. परंतु स्वत:ला काय समजून बसले आहेत?

जुन्या पिढीवाले जर मुलांसोबत कटकट करत असतील तर मी त्यांना विचारु इच्छितो की तुम्ही लहान असताना तुमचे वडील सुद्धा तुम्हाला काही

सांगत होते का? तेव्हा सांगतात की, ते सुद्धा अशीच कटकट करायचे. त्यांच्या वडीलांना विचारले की तुम्ही लहान होते तेव्हा? ते सुद्धा अशीच कटकट करायचे. त्यांच्या वडीलांना विचारले की तुम्ही लहान होते तेव्हा? ते सुद्धा सांगतात की, आमचे वडील देखिल कटकट करायचे. म्हणून हे 'पुर्वापार चालत आलेले आहे!' 'आगे से चली आयी!'

मुलगा जुन्या गोष्टी स्विकारायला तयार नाही. म्हणून ह्या सगळ्या अडचणी उभ्या राहिल्या आहेत. मी बापाला मॉडर्न (आधुनिक) होण्यास सांगतो पण ते होत नाही. कसे होणार? मॉडर्न होणे ही काही सोपी गोष्टी नाही.

आपला देश युझलेस (बेकार) होऊन गेला आहे! काही जातींचा खूप तिरस्कार करत असतात. एक-दुसऱ्या सोबत बसत नाही, भेदभाव करीत असतात. वर हात ठेऊन प्रसाद देतात! परंतु ही नवीन पिढी हेल्दी माईन्डवाली आहे. खूपच चांगली आहे!

मुलांसाठी चांगली भावना करतच रहा. सर्व चांगले संयोग जुळून येतील. नाहीतर ह्या मुलांमध्ये काही सुधारणा होणार नाही. मुले सुधारतील परंतु आपआपल्या परीने, निसर्ग सुधरवेल त्यांना. मुले चांगल्यात चांगली आहेत. कोणत्याही काळात नव्हती अशी मुले आहते आज!

ह्या मुलांमध्ये असे कोणते गुण असतील की मी असे सांगतो आहे की कोणत्या काळात नव्हती असे गुण ह्या मुलांमध्ये आहेत! बिचाऱ्यांमध्ये कोणत्याही प्रकारचा तिरस्कार नाही. काही सुद्धा नाही. फक्त मोही आहेत! सिनेमा पहायला, दुसरे काही पहायला भटकत असतात. पण पूर्वी तर इतका तिरस्कार होता की ब्राह्मणांची मुले दुसऱ्यांना शिवत नव्हती. आजकाल आहेका अशी डोकेफोडी?

**प्रश्नकर्ता :** आता असे काही नाही. जरा सुद्धा नाही.

**दादाश्री :** सगळा माल स्वच्छ झाला आहे. लोभ सुद्धा नाही, मानाची सुद्धा पर्वा करत नाही. आतापर्यंत तर सगळा खोटा (मलीन) माल होता, मानी-क्रोधी-लोभी ! आणि हे तर मोही आहेत बिचारे.

**प्रश्नकर्ता :** आपण सांगता की आजची जनरेशन 'हेल्दी माईन्डवाली' आहे आणि दुसऱ्या बाजूने पहावे तर सर्व व्यसनी होऊन गेले आहेत, आणि माहीत नाही अजून काय काय आहे ते?

**दादाश्री :** भले ते व्यसनी दिसत असतील, परंतु त्या बिचाऱ्यांना योग्य मार्ग नाही मिळाला तेव्हा मग काय करणार ? पण त्यांचे माईन्ड हेल्दी आहे.

**प्रश्नकर्ता :** हेल्दी माईन्ड म्हणजे काय ?

**दादाश्री :** हेल्दी माईन्ड म्हणजे माझे-तुझे ह्याची जास्त पर्वा करत नाही. आणि आम्ही तर लहान होतो तेव्हा बाहेर कोणाचे काही पडलेले असेल, किंवा कोणी काही दिले तर घेण्याची इच्छा होत असे. कोणाकडे जेवायला गेलो तर घरी खातो त्यापेक्षा थोडे जास्त खात असू. लहान मुलांपासून ते म्हाताऱ्यांपर्यंत सगळे ममतावाले होते.

अरे! ही 'डबल बेड' ची सिस्टम हिन्दुस्थानात होती का? जनावरां सारखे लोक ? हिन्दुस्थानातील स्त्री-पुरुष कधी एकत्र एका खोलीत नसतात! नेहमी वेगळ्या खोलीतच रहात असत! तसे न होता आज हे पहा ना! आता तर बापच बेडरुम बनवून देतो, डबल बेड! ह्यामुळे मुले समजून गेली की, हे जग अशा प्रकारेच चालते. तुम्हाला कल्पना आहे की पूर्वी स्त्री-पुरुषांचे अंथरुन वेगळ्या-वेगळ्या खोलीत असायचे. तुम्हाला माहीत नाही? हे सर्व मी पाहिलेले होते. तुम्ही हे डबल बेड बघितले होते का कधी?

## ९ आई-वडीलांच्या तक्रारी !

एक भाई मला सांगत असे, माझा पुतण्या दररोज नऊ वाजता उठतो. घरामध्ये कोणतेच काम करीत नाही. मग घरातील सगळ्यांना विचारले की हा लवकर नाही उठत ही गोष्ट तुम्हा सगळ्यांना आवडत नाही का? तर सगळे म्हणाले, 'आम्हाला आवडत नाही, तरी पण तो लवकर उठतच नाही.' मी विचारले, 'सूर्यनारायण उगवल्यावर तर उठतो की नाही उठत?' तेव्हा म्हणाले, 'त्यानंतर सुद्धा एक तासानंतर उठतो.' त्यावर मी सांगितले की, 'सूर्यनारायणची सुद्धा मर्यादा ठेवत नाही, तो तर मग खूप मोठा माणूस असेल!' नाहीतर लोक सुर्यनारायण उगवण्याच्या अगोदरच झोपेतून जागे होतात, परंतु हा तर सुर्यनारायणाची सुद्धा पर्वा करत नाही.' मग त्या लोकांनी

सांगितले, तुम्ही त्याला थोडे रागवा. मी सांगितले, 'आम्ही रागवू शकत नाही. आम्ही रागवायला नाही आलो, आम्ही समज द्यायला आलो आहोत, आमचा रागवण्याचा व्यापारच नाही, आमचा तर समज देण्याचा व्यापार आहे.' मग त्या मुलाला सांगितले, 'दर्शन करुन घे, नंतर दररोज बोल की दादा मला लवकर उठण्याची शक्ति द्या.' एवढे त्याच्याकडून करवून घेतल्यानंतर घरातील सर्व लोकांना सांगितले, की आता तर हा चहाच्या वेळेवरही उठला नाही तर त्याला विचारायचे की, 'भाई, हे पांघरुन देऊ तुला? हिवाळ्याची थंडी आहे, ओढायचे असेल तर पांघरुन देऊ का तुला?' मस्करी म्हणून नाही, परंतु खरोखर त्याला पांघरुन पांघरायचे. घरातील लोकांनी तसे केले. परिणाम स्वरुप सहा महिन्यातच तो मुलगा एवढा लवकर उठायला लागला की, घरातील सगळ्या लोकांची तक्रार बंद झाली.

**प्रश्नकर्ता :** हल्लीची मुले अभ्यासापेक्षा खेळण्यात जास्त लक्ष देतात, त्यांना अभ्यासाकडे वळविण्यासाठी त्यांच्याकडून कशाप्रकारे काम घ्यायचे की, ज्यामुळे मुलांच्या प्रति क्लेश निर्माण होणार नाही?

**दादाश्री :** इनामी योजना काढा ना! मुलांना सांगा की, ज्याचा पहिला नंबर येईल त्यास एवढे बक्षीस देणार आणि सहावा नंबर येईल, त्याला एवढे बक्षीस आणि पास होईल त्याला एवढे बक्षीस. त्यांचा उत्साह वाढेल असे काही करा. त्याला त्वरित फायदा होईल असे काही दाखवा, तरच मग तो आव्हान स्विकारेल. दुसरा काय उपाय करणार? नाहीतर त्याच्यावर प्रेम ठेवा. जर प्रेम असेल तर मुले सर्व काही स्विकारतात. माझ्याकडे मुले सर्व काही स्विकारतात. मी जे सांगेन ते करण्यास तयार असतात, म्हणजे आपण त्यांना सतत समजावत राहिले पाहिजे. मग ते जे करतील ते खरे.

**प्रश्नकर्ता :** मुख्य समस्या ही आहे की अभ्यास करण्यासाठी मुलांना आम्ही बऱ्याच प्रकारे समजावत असतो, परंतु आमच्या सांगण्याने मुले समजत नाही, आमचे ऐकतच नाही.

**दादाश्री :** नाही, ते ऐकत नाही, कारण की तुम्हाला आई होता आले नाही म्हणून. जर आई होता आले असते तर का नाही ऐकणार? त्याचा

मुलगा ऐकत का नाही? तर म्हणे, 'त्याने स्वतःच्या आई–वडीलांचे कधी एकलेच नव्हते ना!'

**प्रश्नकर्ता :** दादाजी, त्यात वातावरणाचा दोष आहे की नाही ?

**दादाश्री :** नाही, वातावरणाचा दोष नाही. खरे तर आई–वडीलांना आई–वडील होता आलेच नाही. आई–वडील बनणे ही तर सर्वात मोठी जबाबदारी आहे. प्रधानमंत्री होण्याची जबाबदारी ही त्यापेक्षा कमी आहे.

**प्रश्नकर्ता :** ते कसे?

**दादाश्री :** प्रधानमंत्री होण्यात तर लोकांचे ऑपरेशन आहे. येथे तर स्वतःच्या मुलांचेच ऑपरेशन व्हायचे आहे. घरामध्ये आल्याबरोबर मुले खुश होऊन जातील असे असायला हवे. आणि आजकालची मुले तर काय म्हणतात? 'आमचे वडील घरात नाही आलेत तर बरे.' अरे, मुर्खा असे असेल तर काय होणार?

म्हणून आम्ही लोकांना सांगत असतो, 'भाऊ, सोळा वर्षानंतर मुलांना फ्रेन्ड म्हणून स्विकारा.' असे सांगितले की नाही !'फ्रेन्डली टोन' (मैत्रीपूर्ण संवाद) असेल ना, तर आपली वाणी चांगलीच निघते, नाहीतर दररोज वडील बनलात तर त्यातून कोणते ही सार निघणार नाही. मुलगा चाळीस वर्षाचा झाला असेल तरीही आपण बापपणा दाखवत राहणार तर कसे होणार?

**प्रश्नकर्ता :** परंतु दादाजी, वृद्ध लोक सुद्धा आमच्याशी असे वर्तन करतात, त्यांचे विचार जुनाट (जुने) असतील, तर आम्ही त्यांना कसे हैन्डल (हाताळायला) करायचे ? कोणत्या प्रकारच्या बुद्धिने?

**दादाश्री :** ऐन घाईच्यावेळी गाडी जर पंक्चर झाली तर काय आपण तिच्या व्हीलला (चाकाला) मार–मार करतो का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** ऐन वेळी घाई असेल आणि टायर पंक्चर झाले तर व्हीलला मारायला पाहिजे का? तेव्हा तर सर्व पटापट सांभाळून आपले काम

करुन घ्यायला हवे. बिचाऱ्या गाडीला जसे पंक्चर होत असतात. तसेच वृद्ध लोकांना सुद्धा पंक्चर होत असतात. आम्ही सांभाळून घ्यायला हवे. गाडीला मार-ठोक करुन चालेल का?

**प्रश्नकर्ता :** दोन भावंडे आपआपसात भांडत असतील, आपणास माहीत आहे की दोघेही समजवण्या पलीकडचे आहेत, अशा वेळी आपण काय केले पाहिजे?

**दादाश्री :** एकदा दोघांना बसवून त्यांना सांगायला हवे की, आपआपसात भांडण्यात फायदा नाही, त्यामुळे तर येणारी लक्ष्मी जात राहते.

**प्रश्नकर्ता :** परंतु ते जर ऐकायलाच तयार नाहीत तर काय करायचे, दादाजी?

**दादाश्री :** राहू द्यायचे. जसे आहे तसे राहू द्यायचे.

**प्रश्नकर्ता :** मुले आपआपसात भांडतात आणि ते जर विकोपाला गेले तर आम्ही म्हणतो की हे असे कसे झाले?

**दादाश्री :** त्यांना बोध घेऊ द्या ना, आपआपसात भांडल्यामुळे स्वत:ची स्वत:लाच समज येईल ना? असे पुन्हा-पुन्हा आवर घालत राहिल्याने बोध नाही होणार. जग फक्त निरीक्षण करण्यायोग्य आहे. जगत तर जाणण्यायोग्य आहे.

ही अपत्य कोणाची होतच नाहीत, हे तर माथी येऊन पडलेली जंजाळ आहे! म्हणजे त्यांची मदत अवश्य करावी पण आतून नाटकीय राहून.

तक्रार करायला प्रथम कोण येत असते? कलियुगात तर जो गुन्हेगार असेल, तोच प्रथम तक्रार घेऊन येत असतो ! आणि सत्युगात जो निर्दोष असेल तो तक्रार घेऊन येत असे. ह्या कलियुगात न्याय करणारे देखिल असे आहेत की ज्याचे प्रथम ऐकले त्याच्या बाजूने होऊन जातात (त्यांचीच बाजू घेतात.)

घरात चार अपत्ये असतील, त्यातील दोघांची काहीच चुक नसेल तरी सुद्धा वडील त्याला सारखे दटावत असतात आणि दुसरे दोन चूका

करत असतील तरी सुद्धा त्यांना कोणी काही बोलणार नाही. असे सर्व घडते ते त्याच्या मागे असलेल्या रूटकॉझ (मुळ कारणा) मुळे. आपल्या घरी दोन अपत्ये असतील, तर दोघे समान वाटायला हवीत. जर आपण एकाच्या बाजूने असाल की, 'हा मोठा दयाळू आहे आणि लहान कमी पडतो.' तर सर्व बिघडून जाते म्हणून दोघेही समान वाटायला हवेत.

**प्रश्नकर्ता :** मुलगा घटक्या-घटक्याला रुसतो.

**दादाश्री :** खूप महाग आहे ना! खूप महाग, मग काय होणार? मुलगी स्वस्त आहे, म्हणून रूसत नाही बिचारी.

**प्रश्नकर्ता :** हे रूसने का होत असेल, दादाजी?

**दादाश्री :** हे तर मनवायला जातात ना, म्हणून रूसतो. माझ्याकडे रूसून दाखवा तर! माझ्या जवळ कोणी रूसत नाही. मी पुन्हा बोलवणारच नाही ना! पुन्हा बोलणार नाही, खावो किंवा न खावो, पण मी काही बोलायला जात नाही. मला माहित आहे, अशामुळे उलट वाईट सवय लागते, जास्त वाईट सवय लागते. नाही, नाही, बाळ जेवण करुन घे, बाळ जेवण करुन घे, अरे, भूक लागेल तर बाळ आपणहून खाऊन घेईल, कुठे जाणार आहे? तश्या तर मला दुसऱ्या कला सुद्धा येतात. खूप आखडू असेल तर भूक लागलेली असणार तरी सुद्धा नाही खाणार. असे असेल तर आम्ही आत त्याच्या आत्म्याजवळ विधी करतो, तुम्ही असे नाही करायचे. तुम्ही जे करीत आहात तेच करा. बाकी माझ्या जवळ नाही रूसत आणि येथे माझ्याकडे रूसून सुद्धा काय फायदा काढणार?

**प्रश्नकर्ता :** दादाजी, ही कला शिकवा ना, कारण की हे रूसने-मनवणे तर सगळ्यांना नेहमीचेच होऊन गेले आहे. जरा अशी एकाधी चावी द्या की सगळ्यांचे निराकरण होऊन जाईल.

**दादाश्री :** आपल्याला खूप गरज असेल तर तो असा रूसून बसतो. एवढी सर्व गरज दाखवायचीच कशाला मग?

**प्रश्नकर्ता :** म्हणजे याचा अर्थ काय, मी समजलो नाही, खूप गरज असेल तर असा रूसून बसतो? कोणाला गरज असते?

**दादाश्री :** समोरच्याला गरज असते ना तेव्हा. रूसणारा माणूस समोरच्याला त्याची गरज असेल तेव्हा तर रूसून बसतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आम्हाला गरजच नाही असे दाखवायचे?

**दादाश्री :** गरज असायलाच नको, गरज कशासाठी? कर्माच्या उदयानुसार जे होणार आहे ते होणारच मग त्याची गरज का ठेवायची? आणि मग कर्माचा उदयच आहे. गरज दाखवल्यामुळे उलट जिद्दीला पेटतात.

**प्रश्नकर्ता :** लहान मुलांचा राग दूर करण्यासाठी त्यांना थोडक्यात कसे समजावयाचे?

**दादाश्री :** त्यांचा राग दूर करुन काय फायदा?

**प्रश्नकर्ता :** आमच्यासोबत भांडणार नाहीत.

**दादाश्री :** त्यासाठी दुसरा काही उपाय करण्याऐवजी त्यांच्या आई-वडीलांनी अशाप्रकारे रहायला हवे की त्यांचे रागवणे मुलांना दिसूच नये. त्यांना रागवताना बघतात त्यामुळे मुलांना वाटते की माझे वडील करतात, तर मी त्यांच्याहून सव्वापटीने रागवेन तेव्हाच खरे. जर तुमचे बंद झाले, तर त्यांचे आपोआपच बंद होऊन जाईल. मी बंद केले आहे, माझे रागवणे बंद होऊन गेले आहे, म्हणून माझ्याशी कोणी रागवतच नाही. मी सांगतो रागव तरी सुद्धा कोणी रागवत नाही. मुले सुद्धा नाही रागवत, मी मारतो तरी सुद्धा रागवत नाही.

**प्रश्नकर्ता :** मुलांना चांगल्या मार्गावर वळवण्याचे आई-वडीलांचे कर्तव्य तर पार पाडायला पाहिजे ना, त्यासाठी रागावावे तर लागते ना?

**दादाश्री :** कशाला रागवावे लागते? असेच समजावून सांगण्यास काय हरकत आहे? तुम्ही रागवत नाही, तुमच्याकडून रागावले जाते. रागावले जाते त्याला रागावले, असे म्हणता येणार नाही. तुम्ही स्वतः जर रागावलात तरच, हे तुम्ही धमकावले, ते नाही, त्याला रागवणे म्हणत नाही. म्हणजे रागवायचे पण तुम्ही तर स्वतः रागवणारे होऊन जातात. रागवायला हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** रागवण्याचे कारण काय?

**दादाश्री :** विकनेस, ही 'विकनेस' (निर्बलता) आहे. म्हणजे तो

स्वत: रागवत नाही, तर रागवून झाल्यानंतर त्याच्या लक्षात येते की हे चुकीचे होऊन गेले, असे व्हायला नको होते, म्हणजे हे त्याच्या ताब्यात नाही. ही मशीन गरम झालेली आहे, म्हणून त्यावेळी आपण थोडे थंड रहायला पाहिजे. जेव्हा आपोआप थंड होईल तेव्हा हात लावायचा.

मुलांवर तुम्ही चिडतात ते नवीन कर्ज घेतल्यासारखे आहे, कारण की चिडण्यास हरकत नाही, पण तुम्ही 'स्वत:' चिडतात त्यास हरकत आहे.

**प्रश्नकर्ता :** जोपर्यंत मुलांना रागवत नाही तोपर्यंत शांत होतच नाहीत, त्यामुळे रागवावे तर लागते ना!

**दादाश्री :** नाही, रागावण्यास हरकत नाही परंतु 'स्वत:' रागवतात म्हणून तुमचा चेहरा बिघडून जातो, त्याची जबाबदारी आहे. तुमचा चेहरा बिघडणार नाही असे रागवा, चेहरा चांगला ठेऊन रागवा, खूप रागवा! तुमचा चेहरा बिघडतो, म्हणजे तुम्ही जे रागावतात ते तुम्ही अहंकाराने रागवत असतात.

**प्रश्नकर्ता :** तेव्हा तर मुलांना असे वाटेल की, हे खोटे-खोटे च रागवत आहेत!

**दादाश्री :** त्यांना जर एवढे कळले तरी पुष्कळ झाले. तर त्यांच्यावर परिणाम होईल, नाहीतर परिणामच होणार नाही. तुम्ही खूप रागावलात तर ते समजतात की हे कमकुवत आहेत. मुले मला सांगतात, आमचे वडील खूप कमकुवत मनुष्य आहेत, खूप चिड-चिड करतात.

**प्रश्नकर्ता :** असे रागवायला नको की स्वत:लाच मनात विचार येत राहतील आणि स्वत:वर त्याचे परिणाम होईल!

**दादाश्री :** हे तर चुकीचे आहे. रागावणे असे नाही व्हायला पाहिजे. रागवायचे वरकरणी, जसे की नाटकात भांडतो, त्याप्रमाणे असायला हवे. नाटकात भांडत असतो, 'तू असे का करतोस आणि असे तसे' सर्व बोलत असतो पण आतमध्ये काही सुद्धा होत नाही, असे रागवायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** मुलांना सांगण्यासारखे वाटते तेव्हा रागावत असतो, तेव्हा त्यांना दु:ख सुद्धा होत असेल तेव्हा काय करायचे?

**दादाश्री :** नंतर आपण आतून माफी मागयची. ह्या बहीणीला खूप जास्त बोलले गेले असेल आणि तिला दु:ख झाले असेल तर तुम्ही ह्या बहीणीला सांगायचे की मी तुमची क्षमा मागतो. जर हे सांगता येईल असे नसेल तर अतिक्रमण झाले म्हणून आतून त्याचे प्रतिक्रमण करायचे. तुम्ही तर 'शुद्धात्मा आहात' म्हणून तुम्ही 'चंदूभाईला' (वाचकांनी येथे स्वत:चे नांव समजायचे.) सांगायचे की, 'प्रतिक्रमण करा.' तुम्हाला दोन्ही विभाग वेगळे ठेवायचे आहेत. एकटे असाल तेव्हा आतमध्ये आपण आपल्यालाच सांगायचे की 'समोरच्याला दु:ख होणार नाही असे बोलायचे.' तरीसुद्धा मुलाला दु:ख झाले तर 'चंदूभाईला' सांगायचे, 'प्रतिक्रमण करा.'

**प्रश्नकर्ता :** परंतु आपल्यापेक्षा लहान असेल, आपला मुलगा असेल तर क्षमा कशी मागयची?

**दादाश्री :** आतून क्षमा मागायची, हृदयापासून क्षमा मागायची. असे दादा दिसतील आणि त्यांच्या साक्षीत अलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यान त्या मुलाचे केले तर ते लगेच त्याला पोहचते.

**प्रश्नकर्ता :** आम्ही कोणाला रागवतो, परंतु त्याच्या भल्यासाठी रागवले असेल, जसे मुलांनाच रागवतो तर ते पाप गणले जाईल काय?

**दादाश्री :** नाही, त्यामुळे पुण्य बांधले जाते. मुलाच्या भल्यासाठी रागावले-मारले तरी सुद्धा पुण्य बांधले जाते. भगवंताच्या घरी अन्याय होतच नाही ना! मुलगा काही उलट वागत असल्यामुळे स्वत:ला अस्वस्थ वाटत असेल म्हणून त्याच्या भल्यासाठी त्याला दोन थप्पड मारल्यात, तरी सुद्धा त्याचे पुण्य बांधले जाते. त्यामुळे जर पाप गणले गेले असते तर हे क्रमिक मार्गातील साधू-आचार्य यापैकी कोणाचाही मोक्ष होऊच शकला नसता. दिवसभर शिष्यांप्रति अस्वस्थ होत असतात, रागवतात परंतु त्यामुळे पुण्य बांधले जाते. कारण की दुसऱ्यांच्या भल्यासाठी ते क्रोध करतात. स्वत:च्या भल्यासाठी क्रोध करणे पाप आहे. हा किती सुंदर न्याय आहे! किती न्यायपूर्ण आहे! भगवान महावीरांचा न्याय किती सुंदर आहे! हा न्याय तर धर्मकाटाच आहे ना!!

म्हणून मुलांना त्यांच्या भल्यासाठी रागवत असाल, मारीत असाल तरी

त्याचे पुण्य बांधले जात असते. परंतु 'मी बाप आहे, त्याला थोडे मारायला तर हवे ना?' आतमध्ये जर असे बाप असल्याचे भाव येत असेल तर मग पाप बांधेल. अर्थात् जर योग्य समज नसेल तर मग त्यात असे विभाजन होत असते!

अर्थात् वडील मुलांवर चिडले तर त्याचे फळ काय? पुण्य बांधले जाईल.

**प्रश्नकर्ता :** वडील तर चिडतात, परंतु मुलगा सुद्धा समोर चिडत असेल तर काय होणार?

**दादाश्री :** मुलगा पाप बांधतो. क्रमिक मार्गात 'ज्ञानीपुरुष' शिष्यावर चिडले तर ते जबरदस्त पुण्य बांधत असतात, पुण्यानुबंधी पुण्य बांधत असतात. हे चिडणे व्यर्थ जात नसते. हे हे शिष्य नाहीत त्यांची मुले, की नाही काही घेणे-देणे, तरी सुद्धा त्यांच्यावर चिडत असतात.

आमच्याजवळ येथे रागवणे बिलकुल होत नाही! रागावल्यावर माणूस स्पष्ट नाही बोलू शकत, कपट करतो. यामुळेच हे सर्व कपट जगात उत्पन्न झाले आहेत! ह्या जगामध्ये रागावण्याची आवश्कता नाही. मुलगा सिनेमा पाहून आला असेल आणि आपण त्याला रागावले तर दुसऱ्या दिवशी काहीतरी बहाणा करुन, 'स्कूलमध्ये काही कार्यक्रम होता' असे सांगून सिनेमा पाहून येईल! ज्यांच्या घरामध्ये आई कडक असेल, तिच्या मुलांना व्यवहार शिकणे जमत नाही.

**प्रश्नकर्ता :** मुलगा खूप पेप्सी पितो, खूप कोक पितो, चॉकलेट खूप खातो, त्यावेळी मी रागावतो.

**दादाश्री :** त्यात रागावण्याची काय गरज आहे! त्याला समजावयाला पाहिजे की, जास्त खाल्याने काय नुकसान होणार. तुमच्यावर कोण रागावत असते? हा तर वरिष्ठपणाचा खोटा अहंकार आहे! मोठी, 'आई' होऊन बसली आहे!! आई होणे तर येत नाही आणि दिवसभर मुलाला रागवत राहते! तुझ्यावर जर सासू रागवेल तर तुला कळेल. मुलाला रागावणे कोणाला आवडेल का? मुलाला सुद्धा असे वाटेल की ही (आई) तर सासूपेक्षाही

वाईट आहे. म्हणून मुलास रागवणे सोडून दे. त्याला शांतपणे समजावयाचे की हे असे खाऊ नको, त्यामुळे तुझी तब्बेत बिघडेल.

तो चुकीचे करीत असेल तरी पण त्याला सारखे-सारखे मारणे योग्य नव्हे. चुकीचे वागत असेल म्हणून सारखे-सारखे मारले तर काय होईल? एक माणूस तर जसे कपडे धुतात, त्याप्रकारे मुलाची धुलाई करीत होता. अरे मुर्खा! बाप असून मुलाची ही काय काय दशा करतो आहे? त्याक्षणी मुलगा मनात काय ठरवत असतो, माहीत आहे का? सहन होत नसल्यामुळे तो मनात ठरवतो, की,'मोठे झाल्यावर मी तुम्हाला मारेल, बघाच तुम्ही.' असा पक्का निश्चय करुन टाकतो. आणि नंतर मोठे झाल्यावर त्याला रोज मारतही असतो.

मारल्याने जग सुधरत नाही. रागावण्याने किंवा चिडल्याने सुद्धा कोणी सुधरत नाही. योग्य ते करुन दाखविल्यावर सुधारते. जेवढे बोलाल तेवढा वेडेपणा ठरेल.

एक भाई होते. ते रात्री दोन वाजता काय-काय करुन घरी येत असत! त्याचे वर्णन करण्यासारखे नाही. तुम्हीच समजून जा. मग घरातील लोकांनी ठरविले की त्याला रागवायचे की घरात घुसू नाही द्यायचे? कोणता उपाय करावा? नंतर त्या लोकांनी अनुभव घेतला. त्याचा मोठा भाऊ सांगायला गेला तर तो त्याला म्हणे, 'तुला मारल्या शिवाय सोडणार नाही.' मग घरातील सगळे मला विचारायला आलेत की, 'ह्याचे काय करावे ? हा तर असा बोलतो.' तेव्हा मी घरच्यांना सांगितले की, 'कोणी एक अक्षर सुद्धा बोलायचे नाही. बोललात तर तो अजून जास्त उर्मट होईल, घरात यायला दिले नाही तर तुमच्या जीवावर उठेल. त्याला जेव्हा यायचे असेल तेव्हा येऊ द्या आणि जेव्हा जायचे तेव्हा जाऊ द्या. आपण त्याचे 'राइट' (खरे) पण नाही बोलायचे आणि 'रॉंग' (खोटे) पण नाही बोलायचे. राग पण नाही करायचा, द्वेष पण नाही करायचा. समता ठेवायची आहे, करुणा ठेवायची आहे.' तीन-चार वर्षानंतर तो भाई सरळ मार्गावर आला! आज तो व्यापारामध्ये खूप मदत करतो आहे. जग वायफळ नाही आहे, परंतु काम करवून घेता यायला हवे. सर्वांच्या आत भगवंत आहेत आणि सगळे वेगवेगळे कार्य घेऊन बसले आहेत, म्हणून नापसंत असे मत ठेवू नये.

एक माणूस संडासाच्या दरवाज्याला लाथा मारीत होता. मी विचारले, ‘लाथा का मारतो आहेस?’ तो म्हणाला, ‘खूप साफ करतो तरी सुद्धा दुर्गंधी येत राहते.’ बोला, आता ही केवढी मोठी मुर्खता म्हणायची! संडासाच्या दरवाज्याला लाथा मारल्यावर सुद्धा दुर्गंधीच येते! ह्यात चुक कोणाची?

कित्येक लोक तर मुलाला खूप मारतात, ही काय मारण्याची वस्तू आहे? हे तर ग्लास वेअर (काचेच्या वस्तू) सारखे आहे. ‘काचेची वस्तू’ सांभाळून ठेवायला हवी. ‘काचेची वस्तू’ अशी फेकली तर? ‘हॅन्डल विथ केअर.’ अर्थात् सांभाळून ठेवा. आता असे नाही करायचे.

असे आहे की, ह्या जन्माच्या मुलांची चिंता आपण करीत असतो, परंतु मागच्या जन्मात जी मुले होती त्यांचे काय केले? प्रत्येक जन्मात मुले सोडून आला आहात, जेथे जन्म घेतला त्या जन्मातील सगळी मुले सोडूनच आलो आहोत. एवढी लहान–लहान की बिचारी भटकून जातील, अशा मुलांना सोडून आलो आहोत. तेथून येण्याची इच्छा नव्हती, तरी देखिल येथे आलो आहोत. नंतर विसरलो आणि मग ह्या जन्मात दुसरी मुले आली! म्हणून मुलांच्या बाबतीत क्लेश कशाला करता? त्यांना धर्माच्या मार्गावर वळवा, ती चांगली होतील.

एक मुलगा तर इतका तिरसट होता की कडू औषध पाजले तर प्यायचाच नाही, घशा खाली उतरू द्यायचा नाही, परंतु त्याची आई सुद्धा पक्की होती. मुलगा जर एवढा तिरसट असेल तर त्याची आई कच्ची असणार का? तर आईने काय केले, त्याचे नाक दाबले आणि औषध एका झटक्यात घश्यात उतरले. परिणाम स्वरुप मुलगा अजून पक्का झाला! दुसऱ्या दिवशी ती जेव्हा औषध पाजत होती आणि नाक दाबायला गेली तर त्याने फूऊऊऊ करुन आईच्या डोळ्यात उडविले! ही तर तशीच ‘क्वॉलिटी’! आईच्या पोटात नऊ महिने बिनभाड्याने राहिला तो नफा आणि वरून फूऊऊऊ करतो!

एक वडील मला सांगत होते की ‘माझा तीन नंबरचा मुलगा खूप वाईट आहे. दोन मुले चांगली आहेत.’ मी विचारले, ‘तो वाईट आहे तर तुम्ही काय करणार ?’ तेव्हा म्हणाले, ‘काय करणार? दोन मुलांना मला

काहीही सांगावे लागत नाही आणि ह्या तिसऱ्या मुलामुळे माझे सर्व जीवन बर्बाद होत चालले आहे.' मी विचारले, 'काय करतो तुमचा मुलगा?' तेव्हा ते म्हणाले, 'रात्री दीड वाजता येतो. दारू ढोसून येतो.' मी विचारले, 'मग तुम्ही काय करता?' तेव्हा म्हणाले, 'मी दूरूनच बघतो त्याला, जर माझे तोंड दाखवले तर शिव्या देत राहतो. मी दूरूनच खिडकीतून पहात राहतो की काय करतो आहे?' तेव्हा मी विचारले, 'दीड वाजता घरी आल्यावर काय करतो?' तेव्हा म्हणाले, 'खाण्या-पिण्याचे तर काही बोलायलाच नको, जाऊन त्याचे अंथरुन घालून द्यायचे. आणि तो येवून लगेचच झोपून जातो आणि घोरायलाही लागतो.' यावर मी विचारले, मग तुझी दशा काय होते? तर म्हणाला, तो तर लगेचच झोपून जातो, बिनधास्त 'तर मग चिंता कोण करत असतो?' तेव्हा म्हणाले,'ते तर मीच करत असतो.'

नंतर सांगतो की, 'त्याची ही अवस्था पाहून मला तर रात्रभर झोप येत नाही.' मी सांगितले, 'यात दोष तुझाच आहे.' तो तर आरामात झोपून जातो. तुमचा दोष, तुम्हीच भोगत असतात. मागच्या जन्मात दारूचे व्यसन लावणारा तूच आहे.' त्याला व्यसन लावून सटकलास. कशासाठी सवय लावली? लालच होती म्हणून. म्हणजे मागच्या जन्मात त्याला बिगडवलेस, वाईट मार्गावर चढवलेस, तर आता असे शिकवण्याचे फळ आले आहे ह्या जन्मात. आता आलेले फळ भोगा निवांतपणे! भोगतो त्याची चुक. पहा, तो तर आरामशीर झोपला आहे ना? आणि बाप रात्रभर चिंता करत राहतो. दीड वाजता त्याला जाणीव सुद्धा होते की आता तो आला आहे पण त्याला काही बोलू शकत नाही. वडील भोगतो, म्हणून चुक वडीलाची आहे.

सूनेला असे वाटते की सासरे दुसऱ्या खोलीत बसलेले आहेत. म्हणून ती दुसऱ्यांशी बोलत असते की, 'सासऱ्यांना थोडी अक्कल कमी आहे.' आता त्यावेळी आपण तेथे उभे असू तर आपल्याला ते ऐकायला येईल, तर आपल्या आतमध्ये त्याचा परिणाम होणार. तेव्हा आपण काय समजायला पाहिजे की आपण दुसऱ्या खोलीत बसलेलो असतो तर काय झाले असते? तेव्हा कोणताच परिणाम झाला नसता. म्हणजे येथे आलो त्या चुकीचा हा परिणाम आहे! आपण ही चुक सुधारून घ्यावी, असे समजून की आपण

दुसरीकडेच बसलेलो होतो आणि हे सर्व आपण ऐकलेच नव्हते. अशाप्रकारे चुक सुधारून घ्यायची.

महावीर भगवंताच्या पाठीमागे सुद्धा लोक (उलट-सुलट) बोलायचे. लोक तर बोलतातच, आपण आपली चुक संपवायची. त्याला योग्य वाटले तसे बोलेल. आपल्या वाईट कर्मांचा उदय असेल तेव्हाच तर असे उलट-सुलट त्याच्याकडून बोलले जाते.

मुलांचा अहंकार जागृत झाल्यानंतर त्यांना काहीच सांगू शकत नाही आणि काही बोलायचेच कशाला? त्याला ठेच लागेल तेव्हा शिकेल. मुले पांच वर्षाची होईपर्यंत त्यांना बोलायची सुट आहे. आणि पाच ते सोळा वर्षाच्या मुलांना कदाचित कधी तरी दोन टपल्याही माराव्या लागतील. परंतु वीस वर्षाचा तरुण झाल्या नंतर असे करू शकत नाही. त्याला एक शब्द सुद्धा बोलू नये. बोलणे हा गुन्हा आहे. नाहीतर एकाद्या दिवशी तुमच्यावर बंदूक झाडेल.

'मागीतल्या शिवाय सल्ला देऊ नये' असे आम्ही लिहिलेही आहे! जर कोणी आपल्याला बोलले काही विचारले, तेव्हा आपण सल्ला द्यावा आणि त्यावेळी जे योग्य वाटेल ते सांगावे. सल्ला दिल्यानंतर हे सुद्धा सांगायचे की तुला अनुकूल असेल तसे कर. आम्ही तर तुला हे सांगितले. म्हणजे त्याला वाईट वाटेल असे कोणतेही कारण रहात नाही. अर्थात् आम्हाला हे जे सर्व करायचे आहे ते विनयपूर्वक करावे.

ह्या काळात कमीतकमी बोलणे याच्या सारखे दुसरे काहीही नाही. ह्या काळामध्ये वाणी दगडासारखी आघात करणारी निघते, सर्वांचे असेच होत असते. म्हणून बोलण्याचे कमी केलेले जास्त चांगले आहे. कोणाला काही बोलण्यासारखे नाही. बोलल्याने अजून बिघडते. त्याला जर बोललो की, 'गाडीवर लवकर जा.' तेव्हा तो उशीरानेच जाईल आणि काहीही नाही बोललात तर वेळेवर जाईल. आम्ही नसलो तरी सर्व चालेल असे आहे. हा तर स्वत:चा खोटा अहंकार आहे. ज्या दिवसापासून मुलांसोबतची कटकट बंद होईल, त्या दिवसापासून मुले सुधरायला लागतील. तुमचे शब्द चांगले निघत नाही म्हणून समोरचा चिडतो. तुमचे शब्द स्विकारले जात नाही

पण उलट ते शब्द परत येतात. आपण तर मुलांना खाण्या-पिण्याचे बनवून द्यायचे आणि आपले कर्तव्य निभावयाचे, दुसरे काही बोलण्यासारखे नाही आहे. बोलण्याचा फायदा नाही असे तुम्हाला वाटते? असा तुमचा निष्कर्ष निघतो? मुले आत्ता मोठी झालीत, ती काय शिडी वरून पडतील? तुम्ही तुमचा आत्मधर्म का चुकता आहात? ह्या मुलांसोबतचा तर रिलेटिव धर्म आहे. तेथे व्यर्थ डोकेफोडी करण्यासारखी नाही आहे, क्लेश करण्याऐवजी मौन राहणे उत्तम होईल. क्लेशमुळे स्वत:चेही बिघडते आणि समोरच्याचेही बिघडते.

ते तुम्हाला वाईट बोलतील, तुम्ही त्याला वाईट बोलणार! मग वातावरण दुषित होते आणि भडका उडतो. म्हणून तुम्ही त्याला चांगले म्हणावे, कोणत्या दृष्टीने तर एक दृष्टी मनात पक्की करा. की 'आफ्टर ऑल ही इज ए गुड मॅन' (शेवटी तर तो चांगला माणूस आहे.)

**प्रश्नकर्ता :** संघर्ष होतो तेव्हा मुलांसोबत कसे वागायला हवे?

**दादाश्री :** राग-द्वेष व्हायला नको. त्याने काही बिघडविले असेल, किंवा काही नुकसान केले असेल तरी सुद्धा त्याच्यावर द्वेष होऊ देऊ नका. आणि त्याला 'शुद्धात्मा' या रूपात पहा. बस. अर्थात् राग-द्वेष झाला नाही तर सर्व निरसन होऊन गेले आणि आपले ज्ञान राग-द्वेष होऊ देत नाही असे आहे.

आपल्या मनामध्ये थोडीशी पण द्विधा असेल तर ती आपली स्वत:चीच आहे, दुसऱ्या कोणाचीच नाही, हे आपण समजून घेतले पाहिजे. द्विधावस्था का झाली? आम्हाला पाहता नाही आले त्यामुळे. आम्ही 'शुद्धात्मा'च पहायचा आहे. सर्व द्विधा संपवायच्या आहेत 'मी शुद्धात्मा आहे,' बाकी सर्व *'व्यवस्थित शक्ति' आहे. असे 'सॉल्युशन (उपाय) मी दिले.'

मुलाचे लग्न झाल्यावर सून अल्यानंतर कंटाळून जावून चालणार नाही, म्हणून आधीच सावध व्हा. एकत्र राहणार तर क्लेश होणार. त्यामुळे त्याचे जीवन बिघडेल आणि त्यासोबत आपलेही बिघडवेल. जर प्रेम मिळवायचे असेल तर त्याला वेगळे राहू द्या आणि प्रेम जपा, नाहीतर आयुष्य बिघडवून घ्याल आणि त्यामुळे प्रेम सुद्धा घटेल. त्याची पत्नी

*व्यवस्थित शक्ति = रीझल्ट ऑफ सायन्टिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स. म्हणजेच वैज्ञानिक संयोगिक पुरावे एकत्र होवून आलेला परिणाम.

आल्यावर त्याला सोबत ठेवाल तर तो सदैव पत्नीचे सांगितलेलेच ऐकेल, तुमचे ऐकणार नाही. त्याची बायको सांगेल, आज 'आई अशा म्हणत होत्या, नि तशा म्हणत होत्या.' तेव्हा मुलगा म्हणेल, 'होय, आई तशीच आहे.' आणि मग आले तुफान. दूरूनच सगळे चांगले राहते.

**प्रश्नकर्ता :** मुले परदेशात आहेत त्यांची आठवण येत असते, त्यांची चिंता ही होते.

**दादाश्री :** ही मुले तर तेथे खाऊन-पिऊन मजा करीत असतील, आईची आठवण सुद्धा करीत नसतील आणि आई येथे चिंता करीत राहते, ही कशी गोष्ट?

**प्रश्नकर्ता :** मुले तेथून लिहितात की तू येथे ये.

**दादाश्री :** हो, पण जायचे काय आपल्या हातात आहे? त्याऐवजी आपणच जसे आहे तसे समाधान करुन घ्यायचे. त्यात काय चुकीचे आहे? ते त्यांच्या घरी, आपण आपल्या घरी! आपल्या पोटी जन्म घेतला म्हणून काय ते सगळे आपले झालेत? आपले असतील तर आपल्या बरोबर येतील परंतु येते का कोणी ह्या जगात?

घरात पन्नास व्यक्ती असतील, परंतु आपल्याला ओळखता येत नाही म्हणून मतभेदाने क्लेश होत राहणार. त्यांना ओळखायला पाहिजे ना? हे गुलाबाचे रोप आहे की कोणते रोप आहे, हे शोधायला नको का?

पुर्वी काय होते? एका घरात सगळे गुलाब आणि दुसऱ्या घरात सगळे मोगरा, तिसऱ्या घरात चंपा! आता काय झाले आहे की, एका घरात मोगरा आहे, गुलाब आहे, चंपा आहे! गुलाब आहे तर काटे असणारच आणि जर मोगरा असेल तर काटे नसणार, मोगऱ्याचे फूल पांढरे असेल, गुलाबाचे गुलाबी असेल, लाल असेल. ह्या काळात अशी वेगवेगळी रोपे एकत्री आली आहेत. ही गोष्ट तुमच्या लक्षात आली का.

सत्युगात जे शेत होते, आज कलियुगात ते बगीच्या सारखे होऊन गेले आहे! परंतु त्याला पहाता येत नाही, तर काय होणार? ज्याला योग्य प्रकारे पहाता आले नाही तर त्यास दु:ख होणारच ना? लोकांना असे

पहाण्याची दृष्टीच नाही. कोणीही वाईट नसते. हे मतभेद तर आपआपला अहंकार आहे. पहाता येत नाही त्याचे अहंकार आहे. पहाता आले असते तर दुःख झाले च नसते! मला संपूर्ण जगात कोणासोबतही मतभेद होत नाहीत. मला पहाता येते की हा गुलाब आहे की मोगरा आहे. हा धतूरा आहे की कडू शिराळीचे चे फूल आहे, असे सगळ्यांना ओळखतो.

ह्या प्रकृतिला ओळखता येत नाही म्हणून मी पुस्तकात लिहले आहे, 'घर हे बगीचा झाले आहे, म्हणून काम साधून घ्या, ह्या काळात.' जो स्वतः 'नोबल' (उदार) असेल आणि मुलगा कंजूष असेल तर म्हणेल, 'माझा मुलगा खूपच कंजूष आहे.' त्याला तू मारपीट करुन 'नोबल' करू पहातो पण तसे नाही होणार. त्याचा मालच वेगळा आहे, परंतु आई-वडील त्याला स्वतः सारखे बनवू इच्छितात. अरे, त्याला उमलू द्या, त्याच्या ज्या शक्ति आहेत त्या उमलून बाहेर येऊ द्या. कोणाचा स्वभाव कसा आहे, ते पाहून घ्यायचे आहे. अरे मुर्खा, त्यांच्याशी भांडतोस कशासाठी?

अर्थात् हा बगीचा ओळखण्यासारखा आहे. मी 'बगीचा' म्हणतो तेव्हा लोक समजून जातात आणि नंतर मग आपल्या मुलाला ओळखतात. अरे वेड्या, प्रकृतिला ओळख! एकदा मुलाला ओळखून घे आणि त्याप्रमाणे व्यवहार कर ना? त्याची प्रकृति पाहून व्यवहार केला तर काय होईल? मित्राच्या प्रकृतिला 'एडजस्ट' होता की नाही? तसेच प्रकृतिला पहावे लागते, प्रकृतिला ओळखावे लागते. ओळखून घेतले तर घरामध्ये भांडण-तंटा होणार नाही. येथे तर मारून-मुटकून 'माझ्या सारखे बना,' असे सांगत असतात. पण ते तसे कसे बनु शकतील?

सर्व जग अशा व्यवहार ज्ञानाच्या शोधात आहे, हा धर्म नाही आहे. हे ज्ञान संसारात रहाण्याचा उपाय आहे. संसारात एडजस्ट होण्याचे उपाय आहे. वाइफसोबत एडजस्टमेन्ट कशी घ्यायची, मुलांसोबत एडजस्टमेन्ट कशी घ्यायची, याचे उपाय आहेत.

घरात भानगड होते, तेव्हा ह्या (ज्ञान) वाणीचे शब्द असे आहेत की सगळ्यांचे दुःख दूर होतात, ह्या वाणीने सर्व चांगले होते. दुःख दूर होतील, अशी वाणी लोक शोधत असतात. कारण की कोणी अजून असा उपाय दिलाच नाही ना! सरळ उपयोगात घेता येईल असे उपायच नाहीत ना!

# १०. शंकांचे शूळ

एक माणूस माझ्याकडे येत असे. त्याला एक मुलगी होती. मी त्याला सुरुवातीलाच समजावले होते की, 'हे तर कलियुग आहे, ह्या कलियुगाचा परिणाम मुलींवर सुद्धा होत असतो. म्हणून सावध रहायचे.' तो माणूस समजून गेला आणि जेव्हा त्याची मुलगी दुसऱ्या मुलाबरोबर पळून गेली, तेव्हा त्या माणसाने माझी आठवण काढली आणि माझ्याजवळ येऊन मला म्हणाला, 'आपण सांगितलेली गोष्ट खरी होती. जर आपण मला ती गोष्ट सांगितली नसती तर मला विष प्यावे लागले असते.' असे आहे हे जग, पोलंपोल! जे घडेल ते स्विकारायचे, त्यासाठी काय विष प्यायचे? नाही, मुर्खा तू वेडा ठरशील. हे तर कपडे झाकून अब्रू सांभळतात आणि सांगतात की आम्ही खानदानी आहोत.

एक आमचा जवळचा नातलग होता, त्याच्या चार मुली होत्या. तो खूप जागृत होता, मला सांगायचा, 'ह्या मुली मोठ्या झाल्या आहेत, कॉलेजला जातात, परंतु माझा त्यांच्यावर विश्वास बसत नाही.' त्यावर मी त्याला सांगितले, सोबत जा, 'कॉलेजला सोबत जात जा आणि त्या कॉलेजमधून निघाल्या की त्यांच्या मागे मागे जायजे.' अशाप्रकारे एक वेळा जाशील परंतु दुसऱ्यावेळी काय करशील? बायकोला पाठवशील? अरे, विश्वास कुठे ठेवायचा आणि कुठे नाही ठेवायचा, एवढे सुद्धा कळत नाही? आपण मुलींना एवढे सांगून द्यायचे की, 'पहा मुलींनो, आपण चांगल्या घरची माणसं आहोत, आपण खानदानी, कुलवान आहोत.' अशा प्रकारे त्यांना सावधान करायचे. नंतर मग जे घडेल ते 'करेक्ट', त्यावर शंका नाही करायची. शंका घेणारे किती असतील? जे ह्या बाबतीत जागृत असतात ते शंका करतात. असा संशय घेत राहिल्यास कधी पार येईल?

म्हणून कोणत्याही प्रकारची शंका होत असेल तर ती उत्पन्न होण्याच्या ओगदरच उखडून फेकून टाकायची हे तर मुली बाहेर फिरण्यास जातात, खेळायला जातात, त्यात सुद्धा शंका घेतात आणि शंका उत्पन्न झाली तर आपले सुख-चैन टिकून राहते का?

जर कधी मुलगी रात्री उशीरा घरी आली तरी पण शंका घेऊ नका.

शंका काढून टाकली तर किती फायदा होईल? विनाकारण घाबरत राहण्यात काय अर्थ आहे? एका जन्मात काही फेरफार होणार नाही. त्या मुलींना विनाकारण दु:ख देऊ नका, मुलांना दु:ख द्यायचे नाही. मात्र एवढे अवश्य सांगायचे की, 'बाळ, तू बाहेर जातेस परंतु उशीर करु नकोस. आपण खानदानी लोक आहोत, आपल्याला हे शोभत नाही, म्हणून जास्त उशीर करु नकोस.' या प्रकारे सर्व समजावून सांगायचे. परंतु शंका घेणे योग्य ठरणार नाही, 'कोणासोबत फिरत असेल, काय करत असेल?' आणि कधी रात्री बारा वाजता आली, तरी सुद्धा दुसऱ्या दिवशी सांगायचे की, 'बाळ, असे व्हायला नको.' तिला जर घराबाहेर काढले तर ती कोणाकडे जाणार त्याचा काही ठिकाण नाही. फायदा कशात आहे? कमीतकमी नुकसान होईल त्यातच फायदा आहे ना? त्यासाठी मी सर्वांना सांगितले आहे की, 'रात्री मुलगी उशीरा घरी आली तरी तिला घरात घ्यायचे.' तिला बाहेर घालवू नका. नाहीतर बाहेरच्या बाहेर घालवतात, असे कडक स्वभावाचे लोक असतात! काळ केवढा विचित्र आहे! किती दु:खदायी काळ आहे!! आणि ते ही कलियुगात, म्हणून घरामध्ये बसवून तिला समजवायचे.

**प्रश्नकर्ता :** समोरचा जर कोणी आपल्यावर संशय घेत असेल तर आपण त्याचे निरसन कसे करावे?

**दादाश्री :** तो संशय घेत आहे, हे आपल्याला असलेले ज्ञानच विसरून जायचे.

**प्रश्नकर्ता :** त्याला जर आपल्यावर संशय आला, तर आपण त्याला विचारायला हवे की, कसला संशय आला आहे?

**दादाश्री :** विचारण्यात काही मजा नाही आहे, असे विचारायचे पण नाही. आपण लगेचच समजून घ्यायचे की, आपली काहीतरी चुक झाली आहे, नाहीतर त्याला शंका का यावी?

'भोगतो त्याचीच चुक' हे सूत्र वापरले की निरसन होते. शंका करणारा भोगतो आहे की ज्याच्यावर शंका होत आहे, तो भोगतो आहे? ते पाहून घ्यायचे.

## ११. वारसा हक्काप्रमाणे मुलांचे किती ?

**प्रश्नकर्ता :** पुण्योदयाने गरजे पेक्षा जास्त लक्ष्मी प्राप्त झाली तर?

**दादाश्री :** तर सत्कार्यासाठी वापरून टाकायची. मुलांसाठी जास्त ठेऊ नका. त्यांना शिकवायचे, घडवायचे हे सर्व करुन सर्व्हिसला लावायचे, अर्थात मग ते त्यांच्या कामाला लागले, म्हणजे जास्त ठेऊ नका. एवढे लक्षात ठेवायचे की, जेवढे आपल्यासोबत येईल तेवढेच आपले.

**प्रश्नकर्ता :** हा भाऊ, येथून सोबत काही घेऊन जाऊ शकणार आहे का ?

**दादाश्री :** आता काय घेऊन जाणार ? त्याच्या जवळ जे होते ते सर्व येथे येऊन खर्च करुन संपवून टाकले. आता मोक्षासाठी येथे येऊन माझ्याकडून काही मिळवले तर जीवन सुधरेल. अजून आयुष्य उरले आहे. अजूनही जीवनात फेरफार कर. जागे झाले तेव्हापासून सकाळ.

पुढच्या जन्मात सोबत घेऊन जाण्यासाठी कोणती वस्तु आहे ? येथे तुम्ही जे खर्च केले ते सर्व गटारात गेले, तुमच्या मौजमजेसाठी, तुमच्या रहाण्यासाठी जे पण केलेत ते सर्व गटारात गेले. फक्त दुसऱ्यांसाठी जे काही केले तेवढाच तुमचा ओवरड्राफ्ट (जमा) आहे.

एका माणसाने मला प्रश्न केला की मुलांना काहीच द्यायचे नाही ? मी सांगितले, 'मुलांना द्यायचे, तुमच्या वडीलांनी तुम्हाला जेवढे दिले असेल तेवढे सर्वच द्यायचे. मधला, जो तुम्ही कमवलेला माल आहे तो तुम्हाला योग्य वाटेल तेथे धार्मिक–कार्यात वापरुन टाका.'

**प्रश्नकर्ता :** आपल्या वकिलांच्या कायद्यात पण असेच आहे की वडिलोपार्जित प्रोपर्टी (संपत्ती) असेल, ती मुलांना द्यायलाच पाहिजे आणि स्वत:कमवलेल्या संपत्तीचा वापर बापाला जसा करायचा असेल तसे करु शकतो.

**दादाश्री :** होय, जे करायचे असेल ते करु शकता, आपल्या हातानेच करायचे. आपला मार्ग काय सांगतो की तुझा स्वत:चा माल असेल तो वेगळा करुन वापर, तर तो तुझ्यासोबत येईल. कारण की हे 'ज्ञान' प्राप्त केल्यानंतर

अजून एक-दोन जन्म बाकी राहिले आहेत, त्यासाठी सोबत त्याची गरज पडेल ना? बाहेरगावी जातो तेव्हा सोबत थोडी शिदोरी घेऊन जातो. तसेच येथे सुद्धा सोबत काही असायला पाहिजे ना?

म्हणून मुलांना तर फक्त काय द्यायला पाहिजे, एक 'फ्लैट' (घर) द्यायचा, आपण रहात असू तो. ते सुद्धा असेल तर द्यायचा. त्याला सांगायचे की, 'बेटा आम्ही ज्या दिवशी ह्या जगात नसू तेव्हा हे सर्व तुझे, तोपर्यंत मालकी आमची! वेडेपणा करशील तर तुला तुझ्या बायकोसोबत बाहेर काढून टाकेल. आम्ही आहोत तोपर्यंत तुझे काहीही नाही. आम्ही गेल्यानंतर सर्व काही तुझे.' विल (मृत्युपत्र) करुन ठेवायचे. तुमच्या वडीलांनी दिले असेल तेवढे तुम्ही त्याला द्यायचे आहे. तेवढाच त्याचा हक्क आहे. शेवटपर्यंत मुलाच्या मनात असे राहिले पाहिजे की, 'आता वडिलांजवळ पन्नासएक हजार अजून आहेत.' आपल्या जवळ लाख असोत. पण तो मनात समजेल की ४०-५० हजार तर देतील. त्याला त्या लालचमध्ये शेवटपर्यंत ठेवायचे. तो त्याच्या बायकोला सांगेल की, 'जा, वडिलांना फर्स्ट क्लास जेवण वाढ चहा-फराळ आण.' आपण रूबाबात रहायचे. अर्थात आपल्या वडीलांनी जे घर दिले असेल ते त्याला द्यायचे.

कोणी स्वत: सोबत काहीएक घेऊन जाऊ देत नाही. आपण गेल्यावर आपल्या शरीराला जाळून टाकतात. तेव्हा मग मुलांसाठी जास्त सोडून गेलो तर? मुलांसाठी जास्त सोडून गेलात तर मुले काय करतील? ते म्हणतील की, 'आता नोकरी-धंदा करण्याची काही गरज नाही.' मुले दारूडे होऊन जातील. कारण की त्यांना तशी संगत मिळते मग. हे सगळे दारूडेच झाले आहेत ना! म्हणून मुलांना तर पद्धतशीरपणे द्यायला हवे. जर जास्त दिले तर मग दुरूपयोग होईल. नेहमी जॉब (नोकरी) करीत राहिल असे करुन द्यायला हवे. रिकामा बसला तर दारू पिणार ना?

एखादा बिझनेस त्याला आवडत असेल तर तो करुन द्यायचा. कोणता व्यवसाय आवडतो ते विचारून, त्याला जो व्यवसाय योग्य वाटत असेल तो करुन द्यायचा. पंचवीस-तीस हजार बॅन्केतून कर्ज काढून द्यायचे, म्हणजे तो स्वत:च फेडत राहिल आणि थोडे पैसे आपल्या जवळचे द्यायचे. त्याला गरज असेल त्यातील अर्धी रक्कम आपण द्यायची आणि अर्धी रक्कम

बॅन्केतून कर्ज काढून द्यायचे. म्हणजे पंचवीस हजाराचे कर्ज बॅन्केतून, काढ आणि ह्या कर्जाचे हप्ते तू भरत जा, असे त्याला सांगायचे, मुलगा हप्ते भरत राहतो आणि तो समंजसही होतो नंतर.

म्हणून मुलास रीतसर पद्धतीशीर जेवढे द्यायला हवे तेवढे देऊन, बाकी सगळे लोकांच्या सुखासाठी चांगल्या मार्गी वापरायचे. लोकांना सुख केव्हा वाटेल ? जेव्हा त्यांच्या हृदयाला गारवा पहोचेल तेव्हा ! तर ही संपत्ती तुमच्या सोबत येईल. अशी रोकड नाही येत परंतु ओवरड्राफ्टच्या (जमाराशीच्या) रूपात येत असते. रोकड तर सोबत नेऊ देतच नाही ना ! येथे अशा प्रकारे जमाराशी बनवा, लोकांना खायला द्या, सगळ्यांच्या हृदयाला गारवा पोहचवा. कोणाला अडी-अडचणीत मदत करा. हा मार्ग आहे पुढे ड्राफ्ट पाठवण्याचा. अर्थात् पैसाच्या सदुपयोग करा. चिंता करु नका. खायचे-प्यायचे, खाण्या-पिण्यात कंजूशी करु नका. म्हणून मी सांगत असतो की, ' वापरुन टाका आणि जमाराशी बनवा.'

मी त्याच्या मुलांना विचारले की ही सर्व संपत्ती तुमच्या वडिलांनी तुमच्यासाठीच जमविली आहे, तोकडे धोतर नेसून (कंजूशी करुन). तेव्हा ते म्हणाले, 'तुम्ही आमच्या वडिलांना ओळखत नाही.' मी विचारले 'ते कसे ?' तेव्हा ते म्हणाले, 'जर येथून पैसे सोबत नेऊ शकले असते ना, तर आमचे वडील तर लोकांकडून उसणे घेऊन दहा लाख सोबत घेऊन गेले असते असे पक्के आहेत. त्यामुळे ही गोष्ट मनात ठेवण्यासारखी नाही आहे.' त्या मुलानेच मला ही समज दिली. मी म्हणालो की,'आता मला खरी गोष्ट समजली !' मला जे जाणायचे होते ते मला कळाले.'

एकुलता एक मुलगा असेल, त्याला वारस करुन सर्व सोपवून दिले. म्हणाले, 'बेटा, हे सर्व तुझेच आहे, आता आम्ही दोघे धर्माचे करू.' 'आता ही सर्व संपत्ती त्याचीच तर आहे', असे बोलतात तर फजिती होईल. कारण की, त्याला सर्व संपत्ती देऊन टाकल्याने काय होईल ? वडीलांनी सर्व संपत्ती एकुलत्याएक मुलास देऊन टाकली तर मुलगा आई-वडिलांना काही दिवस सोबत ठेवेल परंतु एके दिवशी मुलगा म्हणेल, 'तुम्हाला अक्कल नाही, तुम्ही असे एका जागी बसून रहातात येथे.' तेव्हा मग वडिलांच्या मनात असे येते की मी याच्या हाती लगाम

का सोपिवले?! असा पश्चाताप होईल, त्यापेक्षा तसे न होऊ देता आपण लगाम आपल्या हातातच ठेवायला पाहिजे.

एकाने त्याच्या मुलास सांगितले की, 'ही सर्व संपत्ती तुलाच द्यायची आहे.' त्यावर मुलगा म्हणाला की, मी तुमच्या संपत्तीची आशा ठेवली नाही. तिचा वापर तुम्ही तुमच्या इच्छेनुसार करा, शेवटी निसर्गाचा निर्णय ही वेगळी गोष्ट आहे. परंतु त्याचा निश्चय, आणि त्याप्रमाणे त्याने आपला अभिप्राय दिला ना! म्हणून तो सर्टिफाइड (प्रमाणीत) होऊन गेला, त्याला आता मौज-मजा काही राहिली नाही.

## १२. मोहाच्या माराने मेलो अनेकदा

**प्रश्नकर्ता :** मुले मोठी होतील, मग आपली रहातील की नाही कोणास ठाऊक?

**दादाश्री :** होय, कोणी आपले रहाते का? हे शरीर च आपले रहात नाही तर! हे शरीर सुद्धा नंतर आपल्यापासून घेतले जाते. कारण की परकी वस्तू आपल्या जवळ किती दिवस राहणार?

मुलगा 'पप्पाजी, पप्पाजी' बोलतो तेव्हा मोहापोटी पप्पाजी हवेत तरंगायला लागतात. आणि 'मम्मी, मम्मी' करतो तर मम्मी पण हवेत तरंगते, पप्पांच्या मिशा ओढल्या तरी पण पप्पाजी काहीच बोलेनात. ही लहान मुलं तर असे बरेच काही करत असतात. जर पप्पा-मम्मीचे भांडण झाले असेल तर ही मुलच मध्यस्थी बनून निकाल लावतात. भांडण तर नेहमी होतच असते ना! पति-पत्नीमध्ये तर तसे तू-तू, मी-मी होतच रहाते, तेव्हा मुलगा कशा प्रकारे समाधान करतो? सकाळी ते चहा पित नसतील, थोडेसे रूसले असतील, तर स्त्री मुलामार्फत काय सांगते की, बेटा, जा पप्पांना सांग, 'माझी आई चहा प्यायला बोलवते, पप्पाजी चला ना!' मग मुलगा पप्पांकडे जाऊन बोलतो, 'पप्पाजी, पप्पाजी' असे ऐकून तो सर्व काही विसरून लगेच चहा प्याला येतो. अशा प्रकारे सर्व काही चालत असते. बेटा 'पप्पाजी' बोलला की, अहाहा! माहित नाही कोणता मंत्र बोलला! अरे, आताच तर सांगत होता की मला चहा प्यायचा नाही? असे आहे हे जग!

ह्या जगामध्ये कोणी कोणाचा मुलगा झाला नाही. सर्व जगामध्ये असा

मुलगा शोधून आणा की ज्याच्यावर वडील तीन तास रागवले त्यानंतर सुद्धा तो म्हणेल की, 'हे पूज्य पिताश्री, तुम्ही कितीही रागावले तरी सुद्धा तुम्ही आणि मी एकच आहोत.' असे बोलणारा शोधून आणाल? हे तर अर्धा तास 'टेस्ट' (परीक्षा) वर घेतले असेल तर फुटून जाईल? बदुंकीतील टिकली फुटायला वेळ लागेल, परंतु हा तर लगेच फुटतो. थोडेसे रागविण्यास सुरू केले, तर त्या अगोदरच फुटतो की नाही?

मुलगा 'पप्पाजी, पप्पाजी' करत असेल तेव्हा कडू लागले पाहिजे. जर गोड लागले तर ते सुख उधार घेतले असे होईल. मग ते दुःखाच्या रूपात परत करावे लागेल, मुलगा मोठा झाल्यावर तुम्हाला म्हणेल की,'तुम्ही तर बिन अक्कलेचे आहात.' तेव्हा तुम्हाला वाटेल की हे असे कसे झाले? तुम्ही जे उधार घेतले होते, ते तो वसुल करतो आहे. म्हणून आधीपासूनच सतर्क व्हा. आम्ही तर उधारीचे सुख घेण्याचा व्यवहारच सोडून दिला होता. अहो! स्वतःच्या आत्मामध्ये अनंत सुख आहे! त्याला सोडून ह्या भयंकर घाणीत का पडायचे?

एक सत्तर वर्षाची म्हातारी होती. एके दिवशी घराबाहेर येऊन आरडा-ओरड करायला लागली, 'जळो हा संसार, कडू विषासारखा, मला तर इतका सुद्धा आवडत नाही! हे भगवंता, मला उचलून घे.' तेव्हा एक मुलगा रस्त्याने जात होता तो म्हणाला, 'काय आजी दररोज तर चांगला म्हणत होती, दररोज तर गोड द्राक्षासारखा लागत होता आणि आज कडू कसा झाला?' तेव्हा म्हणायला लागली, जळो, माझा मुलगा माझ्याशी भांडतो. ह्या म्हातारपणी मला म्हणतो, 'चालती हो येथून.'

पूर्वी उपकारी शोधायला बाहेर जावे लागत होते आणि आज तर उपकारी घरच्या घरीच जन्मले आहेत. म्हणून मुलगा जे काही देतो आहे ते शांतपणे स्विकारायचे.

महावीर भगवनांना सुद्धा उपकारी मिळत नव्हते. आर्य देशात उपकारी मिळाले नाही त्यामुळे तर त्यांना मग साठ मैल दूर अनार्य देशात जावे लागले होते, आणि आम्हाला घरी बसल्या उपकारी मिळाले आहेत. मुलगा म्हणतो, 'आम्हाला उशीर झाला तर कटकट करायची नाही. तुम्हाला

झोपायचे असेल तर झोपून जायचे चूपचाप.' वडील विचार करतात, 'आता झोपून जायचे चूपचाप, आता तर चूपचाप झोपलेलेच बरे! हे असे सर्व मला माहित नव्हते, नाहीतर संसार मांडलाच नसता.' आता जे झाले ते झाले. आम्हाला सुरूवातीला असे काही असेल ते माहित नव्हते ना, म्हणून तर संसार थाटला, आणि नंतर फसलो!

**प्रश्नकर्ता :** नावडते आले तर त्यास आत्महेतूसाठी उपयोगात आणायचे, असा अर्थ होतो?

**दादाश्री :** नावडते आले ते आत्म्यासाठी हितकारीच असते. ते आत्माचे विटामिनच आहे. दबाव आला की लगेच आत्मामध्ये राहतो ना? आता कोणी शिवीगाळ केली त्यावेळी संसारात न रहाता लगेचच आपल्या आत्म्यामध्येच एकाकार होऊन जातो परंतु ज्याला आत्माचे ज्ञान झालेले आहे तोच असे करू शकतो.

**प्रश्नकर्ता :** तर मग म्हातारपणी आमची सेवा कोण करणार?

**दादाश्री :** सेवा-चाकरीची अपेक्षा का करायची? आम्हाला त्रास नाही दिला तरी मिळवले. सेवेची अपेक्षा करायची नाही. शंभरातील पाच टक्के सेवा करणारे मिळतील. बाकी ९५ टक्के तर त्रास देतील असेच आहेत.

अहो! मुले तर काय करतात? एक मुलगा त्याच्या वडीलांना सांगतो की, 'तुम्ही मला माझा हिस्सा देऊन टाका, दररोज कटकट करतात ते मी खपवून घेणार नाही.' तेव्हा त्याच्या वडीलांनी सांगितले, 'तू मला एवढा त्रास दिला आहे की मी तुला इतका सुद्धा हिस्सा देणार नाही.'

'ही माझी स्वत:ची कमाई आहे, म्हणून मी तुला ह्या संपत्तीतून काहीच देणार नाही.' तेव्हा मुलगा म्हणाला, 'हे सर्व माझ्या आजोबांचे आहे म्हणून मी कोर्टात दावा दाखल करेन.' मी कोर्टात लढेन परंतु सोडणार नाही. अर्थात् वस्तुत: ही मुले आपली कधी नसतातच.

वडील जर मुलाबरोबर एक तास भांडले, इतक्या घाणेरड्या शिवीगाळ केल्या, तेव्हा मुलगा काय म्हणतो? 'तुम्ही काय समजता?' वारसाहक्काने मिळणाऱ्या संपत्तीसाठी तो कोर्टात दावा सुद्धा दाखल करतो.

मग त्या मुलासाठी चिंता होईल का? ममता सुटली की चिंता पण सुटते. म्हणेल आता तो मुलगा मला नकोच. ही चिंता होत असते, ती ममतावाल्यांना होत असते.

त्याचा साडू आजारी असेल ना, तर बारा वेळा हॉस्पिटलमध्ये भेटायला जातो आणि वडील आजारी असेल तेव्हा तीनच वेळा भेटायला जाणार. अरे मेल्या, असे तू कोणत्या चावीच्या आधारावर करतोस? घरात पत्नी चावी मारते, की 'माझ्या मेहुण्यांना भेटून या.' म्हणजे पत्नीने चावी मारली की लगेच तयार! असे पत्नींच्या आधीन आहे हे जग.

तसा तर मुलगा चांगला असतो, परंतु जर त्याला गुरु (पत्नी) मिळणार नसेल तर. पण गुरू मिळाल्याशिवाय रहात नाही ना! मला काय म्हणायचे आहे की मग गुरु परदेशी असो की इन्डियन असो, पण ती आल्यानंतर आपल्या हातात लगाम (काबू) रहात नाही. म्हणून लगाम पद्धतशीर आपल्या हातात ठेवायला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** मागील जन्मात कोणाशी वैर बांधले असेल, तर ते कोणत्या न कोणत्या तरी जन्मात त्यास भेटून फेडावे लागते ना?

**दादाश्री :** नाही, असे नाही आहे. अशा प्रकारे वैर संपत नाही. वैर बंधनाने आतमध्ये राग-द्वेष होतात. मागील जन्मात मुलासोबत वैर बांधले गेले असेल तर आपल्याला विचार येतात की कोणत्या जन्मात पूर्ण होईल ? अशा प्रकारे मग आम्ही केव्हा एकत्र येऊ? तर तो मुलगा ह्या जन्मात मांजर होऊन येईल. तुम्ही त्याला दूध दिले तर तो तुमच्या तोंडावर पंजा मारेल! असे तुमचे वैर चुकते होत असते. तर असे आहे हे सर्व! परिपाक होणे हा काळाचा नियम आहे म्हणून थोड्या अवधीत हिशोब पूर्ण होऊन जातो. काही जण वैरभावा ने भेटत असतात. समजा असा मुलगा भेटला तर तो वैरभावाने पिळून तेल काढेल आपले. समजले का? शत्रूभावाने आला तर असे होईल की नाही?

**प्रश्नकर्ता :** मला तीन मुली आहेत, त्यांच्या भविष्याबाबत मला त्यांची चिंता वाटत असते.

**दादाश्री :** आपण भविष्याच्या बाबतीत विचार करण्यापेक्षा आजची

सेफ साइड (सुरक्षीतता) करुन घेतलेली बरी. प्रत्येक दिवसाची सेफ साइड करणे चांगले. पुढचे विचार जे करतात ते विचार कोणत्याही प्रकारे 'हेल्पिंग' (सहाय्यक) नाहीत, परंतु नुकसानकारकच आहे. त्याऐवजी आपण प्रत्येक दिवसाची सेफ साइड करीत रहायचे हाच सर्वात उत्तम उपाय आहे.

तुम्हाला मुलां-मुलींचे पालक होऊन, ट्रस्टी होऊन रहायचे आहे. त्यांच्या लग्नाची चिंता करायची नाही कारण ते आपला हिशोब घेऊन आलेले आहेत. मुलीच्या बाबतीत तुम्हाला चिंता करायला नको. मुलीचे तुम्ही पालक आहात. मुलगी स्वत:साठी मुलगा सुद्धा घेऊन आलेली असते. आम्हाला कोणाला सांगायला जाण्याची आवश्कता नाही की आमची मुलगी आहे, तिच्यासाठी मुलाला जन्म द्या. असे सांगायला जावे लागते का? अर्थात् ती आपले सर्व काही घेऊनच आलेली असते. तेव्हा वडील सांगतात, 'ही पंचवीस वर्षाची झाली, पण अजून तिचे लग्न जुळत नाही, असे, तसे,' दिवसभर गात रहातात. अरे! तिकडे मुलगा सत्तावीस वर्षाचा झाला आहे पण तुला भेटला नाही, कशाला बोंबाबोंब करतोस? झोपून जा ना शांतपणे'! मुलगी आपली काळ-वेळ सर्व निश्चित करुनच आलेली आहे.

चिंता केल्याने तर उलट अंतराय कर्म बांधले जातात, त्या कार्याला विलंब होतो. आपल्याला कोणी सांगितले असेल की अमक्या ठिकाणी एक मुलगा आहे, तर आपण प्रयत्न करायचे. भगवंतांनी चिंता करण्यास मनाई केली आहे. चिंता केल्याने तर अंतरायात भर पडत असते. आणि वीतराग भगवानांनी तर काय सांगितले आहे की, 'तुम्ही चिंता करत राहता तर तुम्हीच मालक आहात का? तुम्हीच जग चालवित आहात का?' तसे पाहिले तर लक्षात येईल की आपल्याला तर संडास जाण्याची सुद्धा स्वतंत्र शक्ति नाही. ते जर बंद होऊन गेले तर डॉक्टरांना बोलवावे लागते. तोपर्यंत असे वाटते की ही शक्ति आमची आहे, परंतु ही शक्ति आमची नाही आहे. ही शक्ति कोणाच्या आधीन आहे हे जाणून घ्यायला नको?

हे तर शेवटच्या घटकेला खाटेवर पडलेले असतानाही, लहान मुलीची चिंता करत राहतो की, हिचे लग्न लावायचे राहून गेले. अशा चिंतेत आणि चिंतेतच मरून गेला तर मग पशू योनीत जन्म घेणार. पशूयोनीत जन्म

निंदनीय आहे, परंतु मनुष्य जन्म मिळाल्यावरही सरळपणे रहात नाही तर काय होईल?

## १३. बरे झाले, नाही अडकलो संसारजाळ्यात....

**दादाश्री :** चिंता-बिंता करता का कधी?

**प्रश्नकर्ता :** चिंता खूप नाही, परंतु कधी कधी असे वाटत असते की, तसे तर सर्व काही आहे पण मुल नाही आहे.

**दादाश्री :** अहाहा!!! म्हणजे खाणारा कोणी नाही आहे. एवढे सर्व काही आहे, खायायचे सर्व आहे तरी पण खाणारा कोणी नसेल तर उपाधीच ना!

क्वचितच एखाद्या खूप पुण्यवंतचा जनम लाभला असेल तेव्हा मुल नसते. कारण की मुल होणे न होणे सर्व आपल्या कर्माच्या वहीखात्याचा हिशोब आहे. ह्या जन्मात तुम्ही महा पुण्यवान आहात की तुम्हाला मुल झाले नाही. असे लोक खूप पुण्यवान म्हटले जातात. तर वेड्या, तुला कोणी असे शिकविले? तेव्हा म्हणाला, 'माझी बायको सारखी कटकट करत राहते.' मी म्हणालो, 'मी येईल तिथे.' नंतर मग त्याच्या पत्नीला समजावले मग ती समजून गेली. मी सांगितले की पहा, यांना तर काही समस्या नाही आहे. तुमच्या वहीत खातेच नाही, हे खूप चांगले आहे, नाही का? म्हणून तुम्ही तर परम-सुखीच आहात.

एकही अपत्य नसेल आणि मग मुल जन्मले तर ते मुल बापाला खूष करते, त्यांना खूप आनंदित करते. पण मग जातानाही ते तेवढेच रडवून जाते. म्हणून आपण हे समजून घ्यावे की, आले आहेत ते जेव्हा जातील, तेव्हा काय काय होत असते? म्हणून आजपासून हसायचेच नाही, तर मग काही भानगडच उरली नाही ना!

मुले म्हणजे आपल्या राग-द्वेषाचा हिशोब आहे. पैश्यांचा हिशोब नाही, राग-द्वेषाचे ऋणानुबंध असतात. राग-द्वेषाचा हिशोब फेडायला ही मुले बापाचे पिळून तेल काढतात. श्रेणिक राजाला पण मुलगा होता आणि तो त्यांना रोज चाबकाने फटके मारायचा, तुरूंगात पण घालायचा.

तरीही सांगतात की मला मुले नाहीत, वेड्या मुलांचे करायचे तरी काय आहे? अशी मुले जी त्रास देणारी असतील ती काय कामाची? त्याऐवजी तर शेर माती (मुल) नसलेली बरी. आणि कोणत्या जन्मात तुला शेर माती नव्हती? आता हा मनुष्य जन्म मोठ्या कष्टाने मिळाला आहे, तर मुर्खा, इथे तर सरळपणे रहा ना! आणि काही मोक्षचे साधन शोधून काढ आणि आपले काम साधून घे.

**प्रश्नकर्ता :** मागच्या वर्षी यांचा मुलगा मरून गेला, तेव्हा त्यांना खूप दु:ख झालेले आणि मानसिक रित्या खूप सहन करावे लागले होते. तर सांगतातकी आम्हाला असे जाणून घ्यायची इच्छा होते की मागच्या जन्मात आम्ही असे काय केले असेल, की ज्यामुळे असे घडते ?

**दादाश्री :** त्याचे असे आहे की, ज्याचा जेवढा हिशोब असेल तेवढेच ते आपल्या सोबत राहते, हिशोब पूर्ण झाल्या बरोबर आपल्या वहीखात्यामधून वेगळा होऊन जातो. बस एवढाच त्याचा नियम आहे.

**प्रश्नकर्ता :** काही मुले जन्मल्याबरोबर लगेचच मरतात, तेव्हा काय त्यांचे तेवढेच घेणे-देणे होते?

**दादाश्री :** आई-वडीलांसोबत जेवढा राग-द्वेषाचा हिशोब आहे, तेवढा पूर्ण झाला, म्हणून आई-वडीलांना रडवून जातो, खूप रडवतो, आई-वडील डोके सुद्धा फोडतात. मुलगा डॉक्टराचा खर्च पण करायला लावतो, सर्व काही करायला लावतो आणि नंतर तो निघून जातो.

बाळाच्या मृत्युनंतर त्याच्यासाठी चिंता केल्याने त्याला दु:ख होते. आपले लोक अज्ञानतामुळे असे सर्व करतात. म्हणून तुम्ही जसे आहे तसे यथार्थपणे समजून शांतीपूर्वक रहायला पाहिजे. नंतर विनाकारण डोकेफोड करणे त्याला काय अर्थ आहे?

मुलं कुठे नाही मरत? हे तर संसारिक ऋणानुबंध आहे. घेण्या-देण्याचा हिशोब आहे. आमचे सुद्धा मुलगा-मुलगी होते, पण ते मरून गेले. पाहूणे आले होते ते पाहूणे गेलेत, ते आपले कुठे आहेत? आम्हाला सुद्धा एक दिवस नाही जायचे का? तर आता जे जिवंत आहेत त्यांना आपण

शांती द्यावी. जो गेला तो गेला. त्याची आठवण करणे सुद्धा सोडून द्या. येथे जे हयात आहेत, जेवढे आपल्या आश्रित आहेत, त्यांना शांती द्या, एवढेच आपले कर्तव्य. हे तर गेलेल्यांची आठवण काढतात आणि येथे हयात असलेल्यांना शांती देत नाही, हे कसे? म्हणजे तुम्ही तुमचे सर्व कर्तव्य चुकत आहात. तुम्हाला हे कळते का? गेला तो गेला. खिशातून लाख रूपये कुठे तरी पडून गेले आणि नंतर ते मिळाले नाही तेव्हा आम्ही काय करायला हवे? तर काय डोके फोडायचे?

**प्रश्नकर्ता :** विसरून जायचे.

**दादाश्री :** हो, अर्थात हा सर्व असमंजसपणा आहे. खरोखर तर आपण वडील-मुलगा कोणत्याही प्रकारे नाही आहोत. मुलगा मरून गेला तर त्यात चिंता करण्यासारखे काहीच नाही. खरोखर तर संसारात चिंता करण्यासारखे जर काही असेल तर ते आई-वडीलांचा मृत्यु झाला तरच मनात चिंता व्हायला हवी. मुलगा मरून गेला तर मुलाबरोबर आपले काय घेणे-देणे? आई-वडीलांनी तर आपल्यावर उपकार केले होते. आईने तर आपल्याला नऊ महिने पोटात सांभाळले, मग मोठे केले. वडीलांनी शिक्षणासाठी फी दिली, सर्वच काही दिले.

आपणास माझे बोलणे समजते ना? म्हणून आता जेव्हा आठवण आली तेव्हा एवढे बोला ना की, 'हे दादा भगवान, हा मुलगा आपणास स्वाधीन केला!' यामुळे तुम्हाला समाधान वाटेल. तुमच्या मुलाची आठवण करुन त्याच्या आत्म्याचे कल्याण होवो असे मनात बोलत रहा, डोळ्यात पाणी नाही येऊ द्यायचे. तुम्ही तर जैन थिओरी (सिद्धांत) समजणारे मनुष्य आहात. तुम्हाला तर माहित आहे की कोणाचे निधन झाल्यानंतर अशी भावना करायला पाहिजे की, 'त्याच्या आत्म्याचे कल्याण होवो! हे कृपाळुदेव त्यांच्या आत्म्याचे कल्याण करा.' त्याऐवजी आपण मनात कमकुवत होतो हे तर योग्य नाही. आपल्याच नातलगांना दु:खात टाकायचे हे आपले काम नाही. तुम्ही तर समजदार, विचारशील आणि संस्कारी लोक आहात, म्हणून जेव्हा-तेव्हा मृत मुलाची आठवण आली तेव्हा असे बोला की, 'त्याच्या आत्म्याचे कल्याण होवो! हे वीतराग भगवान, त्याच्या आत्म्याचे कल्याण करा.' असे बोलत राहायचे. कृपाळुदेवाचे नांव घेणार, किंवा दादा भगवान

बोलाल तरी सुद्धा आपले काम होईल. कारण की दादा भगवान आणि कृपाळुदेव आत्मस्वरूपाने एकच आहेत, शरीराने वेगळे दिसतात. डोळ्यांनी वेगळे दिसतात, परंतु वास्तविक ते एकच आहेत. आणि महावीर भगवानांचे नांव दिले तरी पण तेच आहेत. त्याच्या आत्म्याचे कल्याण होवो, एवढीच भावना आपल्याला निरंतर करायची आहे. आपण ज्याच्या सोबत निरंतर राहिलो, सोबत खाल्ले-पिल्ले, तर आपण त्याचे कशाप्रकारे कल्याण होईल अशी भावना करत राहायचे. आपण परक्यांसाठी चांगली भावना करत असतो, मग हे तर आपले स्वजन आहेत, त्यांच्यासाठी भावना का नाही करायची ?

म्हणून आम्ही पुस्तकात लिहिले आहे की, तुला 'कल्प'च्या शेवटपर्यंत भटकावे लागेल. त्याचे नांव 'कल्पांत', कल्पांतचा अर्थ कोणी केलाच नाही ना ? तुम्ही आज पहिल्यांदा ऐकला ना ?

**प्रश्नकर्ता :** होय दादा, पहिल्यांदा ऐकला.

**दादाश्री :** म्हणून ह्या 'कल्प'च्या शेवटपर्यंत भटकावे लागते आणि लोक काय करतात ? खूप कल्पांत करतात. अरे वेड्या कल्पांतचा अर्थ तर विचारून पहा की कल्पांत म्हणजे काय ? कल्पांत तर कोणी एखादा मनुष्य करीत असतो. कल्पांत तर कोणाचा एकुलता एक मुलगा असेल, त्याचा अचानक मृत्यु झाला असेल अशावेळी कल्पांत होऊ शकतो.

**प्रश्नकर्ता :** दादाजींची किती मुलं होती ?

**दादाश्री :** एक मुलगा आणि एक मुलगी होती. १९२८ मध्ये मुलगा जन्मला तेव्हा मी मित्रांना पेढे खाऊ घातले होते. नंतर १९३१ मध्ये मुलगा मृत्यु पावला. तेव्हा पुन्हा मी सर्वांना पेढे खाऊ घातले. सुरूवातील तर सर्वांना असे वाटले की दुसरा मुलगा जन्मला असेल, म्हणून पेढे खाऊ घालत असतील. पेढे खाईपर्यंत मी स्पष्टीकरण केले नाही. पेढे खाऊन झाल्यानंतर मी सर्वांना सांगितले, 'ते 'गेस्ट' (पाहूणे) आले होते ना, ते गेले!' ते सन्मानपूर्वक आले होते, तर आम्ही त्यांना सन्मानपूर्वक निरोप द्यायचा. म्हणून हा सन्मान केला. यावर सर्व मला रागवायला लागले. अरे, असे रागावू नका, सन्मानपूर्वक निरोप द्यायला पाहिजे.

नंतर मुलगी जन्माला आली होती. तिला सुद्धा सन्मानपूर्वक बोलविले आणि सन्मानपूर्वक निरोप दिला. ह्या जगात जे येत असतात, ते सगळे जात ही असतात. त्यानंतर कोणी नाही, मी आणि हीराबा (दादाजींच्या धर्मपत्नी) आम्ही दोघेच आहोत.

(१९५८ मध्ये) ज्ञान होण्या अगोदर हीराबा म्हणायच्या, 'मुलं मरून गेलीत आणि आता आमची मुलं नाही, तर काय करायचे आपण? वृद्धापकाळी आपली सेवा कोण करणार?' त्या सुद्धा चिंतीत झाल्या होत्या! नाही का होणार चिंतीत? तेव्हा मी त्यांना समजावले, 'आजकालची मुले दमछाक करतील तुमचा. मुले दारू पिऊन येतील तेव्हा तुम्हाला बरे वाटेल?' तेव्हा त्या म्हणाल्या, 'नाही ते तर बरे वाटणार नाही.' मग मी सांगितले, हे आले होते ते गेलेत, म्हणून मी पेढे वाटलेत. त्यानंतर जेव्हा हीराबांना अनुभव झाला, तेव्हा मला सांगायला लागल्या, 'सगळ्यांचीच मुले खूप दु:ख देत असतात.' तेव्हा मी सांगितले, 'आम्ही तर आधीच सांगत होतो, परंतु आपण मानत नव्हत्या!'

जे परके आहे, ते कधी आपले होत असतात का? उगीच हायतोबा का करायची. एक तर हे शरीरच परके आहे, आणि ह्या शरीराचे ते परत नातलग! हे शरीर परके आणि ह्या परक्याची ही सर्व संपत्ती. ही कधी आपली होऊ शकते?

**प्रश्नकर्ता :** एकच मुलगा आहे, तो पण आमच्यापासून वेगळा झाला आहे, काय करायचे?

**दादाश्री :** ते तर तीन असतील तरी वेगळे होतात आणि जर ते वेगळे नाही झाले तरी आपल्याला तर जावे लागेल. मग ते जरी एकत्र राहत असतील तरीपण एके दिवशी आपल्याला सर्व काही सोडून जावे लागेल. सोडून जावे नाही लागणार? तर मग हायतोबा कशासाठी? मागच्या जन्माची मुले कुठे गेलीत? मागच्या जन्माची मुले कुठे राहत असतील?

**प्रश्नकर्ता :** ते तर ईश्वरलाच माहीत!

**दादाश्री :** घ्या! मागच्या जन्माच्या मुलांचे माहित नाही, ह्या जन्मातील मुलांचे परत असे झाले. ह्या सर्वांचा अंत कधी येईल? मोक्षात जाण्याचे

बोला ना, नाहीतर विनाकारण अधोगतीमध्ये जाल. समस्यांमुळे जेव्हा उपाधी, कंटाळा येत असेल, तेव्हा कोणती गती होईल? येथून मग मनुष्य योनीमधून कोणत्या योनीमध्ये जन्म होईल? पशू योनीत. अत्यंत निंदनीय काम केले असेल तर नरक योनीमध्ये पण जावे लागते. नरक योनी व पशू योनी हे सर्व पसंत आहे?

प्रत्येक जन्मामध्ये भयंकर मार खाल्ला आहे, परंतु पुर्वीचा खाल्लेला मार विसरून जातो आणि नवीन मार खात राहतो. मागच्या जन्माच्या मुलांना सोडून येतो आणि ह्या जन्माच्या नवीन मुलांना कवटाळत असतो.

## १४. नाती, रिलेटीव की रिअल ?

हे रिलेटिव संबंध आहेत! सांभाळून सांभाळून काम करुन घ्यायचे आहे. हे रिलेटिव संबंध आहेत, म्हणून तुम्ही जेवढे रिलेटिव स्विकारणार तेवढे राहणार. तुम्ही जसे ठेवाल तसे राहिल, याचेच नांव व्यवहार आहे.

तुम्ही मानता की मुलगा माझा आहे, म्हणून कुठे जाणार आहे? अहो! मुलगा तुमचा आहे, परंतु घटक्यात विरोधी होऊन जाईल. कोणी आत्मा वडील-मुलगा नसतो. हे तर परस्परांचा देण्या-घेण्याचा हिशोब आहे. पण बघ हां, घरी गेल्यावर असे बोलू नकोस, की तुम्ही माझे वडील नाहीत. तसे ते व्यवहारने वडील आहेतच ना!

संसारात नाटकीय रहायचे आहे. 'या हो ताईसाहेब', 'ये बाळ', याप्रमाणे, आणि हे सर्व सुद्धा सुपरफ्लुअस (वरकरणी) करायचे. तेव्हा अज्ञानी काय करतो की मुलीला जवळ घेऊन मांडीवर बसवू पाहतो, त्यावर ती मुलगी सुद्धा त्याच्यावर चिडते. ज्ञानी पुरुष व्यवहारात सुपरफ्लुअस रहातात. म्हणून सगळे त्यांच्यावर खुष असतात, कारण की, लोकांना 'सुपरफ्लुअस' व्यवहार हवा असतो. जास्त आसक्ति लोकांना पसंत नाही. म्हणून आपण सुद्धा सुपरफ्लुअस रहायचे. ह्या सर्व भानगडीत पडायचे नाही.

ज्ञानी काय समजतात? की मुलीचा विवाह झाला तर, तो पण व्यवहार आणि मुलगी बिचारी विधवा झाली, तो पण व्यवहार. हे 'रिअल' नसते. हे दोन्हीही व्यवहार आहेत, रिलेटिव आहे आणि त्यास कोणी बदलू शकत नाही असे आहे! तर लोक काय करतात? जावई मरून गेला, त्याच्या

मागे डोक फोडतात, तेव्हा मग डॉक्टर बोलवावा लागतो. म्हणजे हे राग–द्वेषाच्या आधीन आहे ना! व्यवहार, व्यवहार आहे असे समजले नाही म्हणूनच ना!

मुलांना रागवावे लागले, पत्नीला दोन शब्द सांगावे लागले तर नाटकीय भाषेत शांत राहून रागवायचे. नाटकीय भाषा म्हणजे काय की आतून शांतता ठेऊन बाहेर रागवायचे. याला म्हणतात नाटक!

## १५. ते आहे घेणे–देणे, नातं नाही

बायको–मुले जर आपली असतील ना, तर ह्या शरीराला खूप त्रास होत असेल तर त्यातून पत्नीने थोडा घेतला असता, 'अर्धांगिनी' म्हटली जाते ना! अर्धांगवायू झाला असेल तर मुलगा घेणार का? ते तर कोणी घेत नाही. हा तर सर्व हिशोब आहे! वडीलांपासून जेवढा तुमचा मागण्याचा हिशोब होता, तेवढाच तुम्हाला मिळतो.

एका मुलाला काहीही चुक नसतांना त्याची आई त्याला सारखी मारत राहते आणि एक मुलगा खूपच मस्तीखोर असेल, तरी सुद्धा त्याचे लाड करत राहते. पाचही मुले त्याच आईची असतात परंतु पाचहीसोबत वेगवगळे वर्तन करत असते, त्याचे कारण काय?

**प्रश्नकर्ता :** त्यात प्रत्येकाचा कर्म उदय वेग–वेगळा असावा?

**दादाश्री :** हा तर हिशोबच चुकता होत आहे. आईला पाचही मुलांवर सारखा भाव ठेवायला हवा, पण तो राहणार कसा? आणि मग मुले म्हणतात, माझी आई त्याचीच बाजू घेत असते. अशी तक्रार करतात. ह्याचीच भांडणं आहे ह्या जगात.

**प्रश्नकर्ता :** तर त्या आईला त्या मुलावर असा वैरभाव का होत असतो ?

**दादाश्री :** आईचे काही पूर्वजन्मीचे वैर आहे. दुसऱ्या मुलासोबत पूर्वजन्मीचा राग (आसक्ति, मोह) आहे. म्हणून राग करीत असते. लोक न्याय शोधायला जातात की पाचही मुले तिच्यासाठी सारखी का नाहीत ?

काही मुले आपल्या आई वडीलांची सेवा करत असतात, अशी उत्तम सेवा करतात की खाणे-पिणे सुद्धा विसरून जातात. म्हणजे सर्वांसाठी असे नाही आहे. आपल्याला जे मिळाले ते सर्व आपलाच हिशोब आहे. आपल्या दोषामुळे ते आपल्याला मिळाले. ह्या कलियुगामध्ये आपण का आलोत? सत्युग नव्हते? सत्युगात सगळे सरळ होते. कलियुगात सगळे वाकडे भेटतात. मुलगा चांगला असला तर व्याही वाकडे भेटेल, भांडण-तंटा करत राहणारे, सून भांडकुदळ भेटेल जी भांडतच राहिल. कोणी ना कोणी असे वाकडे भेटतच असतात आणि घरामध्ये भाडण-तंटे चालूच राहतात.

**प्रश्नकर्ता :** 'वनस्पतित पण प्राण आहे' असे म्हणतात. आंब्याचे झाड आहे, त्या झाडाच्या जेवढ्या कैऱ्या असतील, त्या सर्व कैऱ्यांची चव एक सारखी असते, परंतु माणसांमध्ये पांच मुले असतील तर त्या पाचही मुलांचे विचार-वाणी-वर्तन वेगवेगळे, असे का?

**दादाश्री :** आंब्यांमध्ये पण वेगवेगळी चव असते, तुमची समजण्याची शक्ति इतकी सूक्ष्म नाही आहे. परंतु प्रत्येक आंब्याची चव वेगवेगळी असते, प्रत्येक पानामध्ये सुद्धा फरक असतो. एकसारखे दिसतात, एकाच प्रकारचा सुगंध असतो, परंतु काही ना काही फरक असतो. कारण ह्या जगाचा नियम आहे की, 'स्पेस' (जागा) बदलल्यास फरक होतोच!

**प्रश्नकर्ता :** सर्वसाधारणपणे म्हणतात ना की ही सर्व कुटुंबे वंश परंपरेने एकत्र येत असतात.

**दादाश्री :** होय, ते सर्व तर आपल्या ओळखीचेच. आपलेच वर्तुळ, सर्व सोबत राहणार. समान गुणवाले आहेत, म्हणून राग-द्वेषाच्या कारणाने तिथे जन्म घेतात आणि राग-द्वेषाचा हिशोब फेडण्यासाठी एकत्र येतात. डोळ्यांनी असे दिसते ते तर भ्रांतीमुळे दिसते परंतु ज्ञानदृष्टिने तसे नाही आहे.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, हा जो जन्म घेणारा आहे, तो आपल्या कर्माने जन्म घेतो ना ?

**दादाश्री :** नक्कीच. तो गोरा आहे अथवा काळा आहे, ठेंगणा आहे

अथवा उंच आहे, हे सर्व त्याच्या कर्माने आहे. हे तर लोकांनी ह्या डोळ्यांनी पाहिले व जुळवून घेतले की, मुलाचे नाक तर एकदम तसेच्या तसे दिसत असते, म्हणून वडीलांचेच गुण मुलामध्ये उतरले आहेत, असे म्हणतात! अर्थात् वडील जगात कृष्ण भगवान झालेत, म्हणजे काय त्याचा मुलगाही कृष्ण भगवान झाला? असे तर कित्येक कृष्ण भगवान होऊन गेलेत. सर्व प्रकट पुरुष कृष्ण भगवानच म्हटले जातात. परंतु त्यांचा एक तरी मुलगा कृष्ण भगवान झाला? अर्थात ह्या सर्व वायफळ गोष्टी आहेत!

जर वडीलांचे गुण मुलामध्ये येत असतील तर मग सर्व मुलांमध्ये ते सारखेच येतील. हे तर वडीलांच्या मागच्या जन्मातले जे ओळखीचे आहे, फक्त त्यांचेच गुण जुळत असतात. तुमच्या ओळखीचे सर्व कसे असणार? जे तुमच्या बुद्धीशी जुळते, तुमच्या हेतूशी जुळते असेच. तर ज्यांचे गुण तुमच्याशी जुळत असेल, ते ह्या जन्मात पुन्हा मुलं होऊन जन्माला येतात. कारण त्यांचे गुण तुमच्याशी जुळतात, परंतु वास्तवात ते त्यांचे स्वतःचेच गुण धारण करत असतात. सायंटिस्ट (वैज्ञानिक)यांना असे वाटत असते की हे गुण परमाणुमधून येत असतात परंतु ते तर आपले स्वतःचेच गुण धारण करीत असतात. मग कोणी वाईट, नालायक असेल तर कोणी दारूड्या पण निपजत असतो. कारण की जसे जसे संयोग त्याने एकत्र केले आहेत, तसेच तेथे घडत असते. काहींना वारसाहक्काने काहीच मिळत नाही. म्हणजे वारसाहक्क हा फक्त दिखावा आहे. परंतु वास्तावात पूर्वजन्मामध्ये जे त्याचे ओळखीचे होते, तेच आले आहेत.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे जो हिशोब फेडायचा आहे, ऋणानुबंध फेडायचे आहे ते फेडल्यावर हिशोब पूर्ण होतो?

**दादाश्री :** होय, ते सर्व फेडले जातात. म्हणून मला येथे हे विज्ञान खुले करुन सांगावे लागले की, अरे, त्यात वडीलांचा काय गुन्हा आहे? तू क्रोधी, तुझे वडील क्रोधी, परंतु हा तुझा भाऊ शांत का आहे? जर तुझ्यामध्ये तुझ्या वडीलांचे गुण आले असतील तर तुझा हा भाऊ शांत का आहे? हे सर्व समजत नाही, म्हणून लोक विनाकारण काहीही सांगत असतात आणि जे बाहेरून दिसेल, त्याला सत्य मानतात. ही गोष्ट बरोबर समजून घेण्यासारखी आहे अतिशय खोलवरची गोष्ट आहे ही. हे तर मी

जे सांगितले तेवढीच नाही, तर खूप खोलवरची गोष्ट आहे! हे तर सर्व हिशोबाने घेतले जाते आणि दिले जाते!

आत्मा कोणाचा मुलगाही नसतो आणि कोणाचा वडीलही नसतो. आत्मा कोणाची पत्नी होत नाही, किंवा कोणाचा पती होत नाही. हे सर्व ऋणानुबंध आहेत. कर्माच्या उदयाने एकत्र आले आहेत. आता (ह्या जन्मातील) लोकांना तसे भासत आहे. आणि आपल्याला सुद्धा असे भासते, तर हे फक्त भासते एवढेच. वास्तवात तर दिसतच नाही. वास्तवात असते तर कोणी लढलेच नसते. ही तर एका तासातच भानगड होऊन जाते, मतभेद होऊन जातात, तेव्हा लढतात की नाही लढत? 'माझे-तुझे' करतात की नाही करत?

**प्रश्नकर्ता :** करतात.

**दादाश्री :** अर्थात् फक्त भास्यमान आहे, 'एक्झॅक्ट' (वास्तविक) नाही आहे. कलियुगात आशा ठेऊ नका. कलियुगात आत्माचे कल्याण होईल असे करा, नाहीतर काळ खूप विचित्र येत आहे, पुढे येणारा काळ भयंकर विचित्र येत आहे. अजून येणारी हजारेक वर्षे चांगली आहेत, परंतु त्यानंतर भयानक काळ येणार आहे. नंतर केव्हा संधी मिळेल? म्हणून आत्मकल्याण करुन घ्या.

**जय सच्चिदानंद**

# मुलांचा आई-वडीलांप्रति व्यवहार
## ( उतरार्ध )

### १६. 'टीनेजर्स' ( तरुणपिढी ) सोबत 'दादाश्री'

**प्रश्नकर्ता :** आदर्श विद्यार्थ्याच्या जीवनात कोण-कोणत्या लक्षणांची आवश्यकता आहे ?

**दादाश्री :** विद्यार्थ्याला त्याच्या घरात जेवढ्या व्यक्ति असतील, त्या सर्वांना खूष ठेवण्याची आवश्यकता आहे आणि तसेच स्कूलमध्ये पण ज्या माणसांसोबत असेल, आपले जे टीचर (शिक्षक) असतील, त्या सर्वांना खूष ठेवण्याची आवश्यकता आहे. आपण जेथे जेथे जातो तेथे सर्वांना खूष ठेवायला हवे आणि आपल्या अभ्यासाकडे पण लक्ष द्यायला हवे.

**दादाश्री :** तू कधी जीव-जंतु मारले आहेस ?

**प्रश्नकर्ता :** होय, दादाजी.

**दादाश्री :** कुठे कुठे मारले होते ?

**प्रश्नकर्ता :** बागेत, वाड्याच्या मागे.

**दादाश्री :** कोणते जीव-जंतु होते ? कोक्रोच (झुरळ) वगैरे होते ?

**प्रश्नकर्ता :** सर्वांना मारलेले आहे.

**दादाश्री :** मनुष्याच्या बाळाला पण मारून टाकतो का ?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** बाळाला नाही मारू शकत ? कोणाचे बाळ असेल तर त्याला मारू नाही शकत ?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** असे का ? आता तू ज्या जंतूला मारलेस, तसाच एक बनवून मला देऊ शकतोस ? एक लाख रूपये बक्षीस देणार. जर एक जीव बनवून दाखवलास तर लाख रूपये बक्षीस देणार. तू बनवू शकशील ?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तर मग आपण कसे मारू शकतो ? तेव्हा ह्या जगात कोणी एक तरी जीव बनवू शकतो का ? काय हे शास्त्रज्ञ बनवू शकतील ?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तर मग जे बनवू शकत नाही, त्याला आपण मारूही शकत नाही. ही खुर्ची बनवु शकतो, ह्या सर्व वस्तू बनवु शकतो, तर त्यांना नष्ट करू शकतो. तुझ्या लक्षात आले ?

**प्रश्नकर्ता :** होय.

**दादाश्री :** आता काय करणार ?

**प्रश्नकर्ता :** कोणाला नाही मारणार.

**दादाश्री :** त्या जंतूला मरण्याची भिती वाटते खरी ? आम्ही मारायला गेलो तर तो पळून जातो का ?

**प्रश्नकर्ता :** होय.

**दादाश्री :** तर मग कसे मारू शकतो ? आणि ह्या गहू, बाजरीला भिती नाही वाटत, त्यास हरकत नाही, काय ? गहू, बाजरी दूधी हे सगळे दूर पळतात का ? आपण सुरी घेऊन गेलो तर दूधी दूर पळते का ?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तर मग त्याची भाजी बनवून खाऊ शकतो. तुला मरण्याची भीती वाटते की नाही ?

**प्रश्नकर्ता :** भीती वाटते.

**दादाश्री :** हो, तर तसेच त्याला सुद्धा भीती वाटत असते.

अनहक्काचा खड्डा तर खूपच खोल ! त्यामधून पुन्हा वर येऊच शकत नाही. म्हणून दक्षतेने चालणे चांगले. म्हणून तू सावध हो. आता तर तुझी युवा अवस्था आहे, जे वृद्ध होणारे असतील, त्यांना आम्ही काही सांगत नाही. हे भय-सिग्नल तुला दाखवित आहोत.

**प्रश्नकर्ता :** होय, होय, घेऊन जाणार नाही, दुसऱ्याच्या पत्नीला घेऊन जाणार नाही.

**दादाश्री :** हो, बरोबर आहे. घेऊन जाण्याचा विचार सुद्धा करायचा नाही. एखाद्या स्त्रीप्रति आकर्षण झाले तरी सुद्धा, 'हे दादा भगवान! मला क्षमा करा' असे म्हणायचे.

मुलांसाठी आई-वडीलांनी काय करावे ? तर मुले बाहेर कुठे मान शोधणार नाहीत असे वागायला हवे. ते जर मानाचे भुकेले नसतील तर बाहेर मानाच्या हॉटेलमध्ये मान खायला जाणार नाहीत. त्यासाठी काय करायचे ? तर तो घरी आल्यावर त्याला असे बोलायचे, 'बाळ, तू तर खूप शहाणा आहेस, असा आहेस, तसा आहेस,' त्याला थोडा सन्मान द्यायचा, अर्थात् त्याच्याशी मैत्रीभाव ठेवायला हवा. त्याच्या सोबत बसून, त्याच्या डोक्यावरून हळूवार हात फिरवून आपण म्हणायचे, 'बाळ चल, आपण जेवायला बसूया, आपण एकत्र नाष्टा करूया' असे सर्व व्हायला हवे. तर मग तो बाहेर प्रेम शोधणार नाही. आम्ही तर पाच वर्षाचा मुलगा असेल तर त्याच्यासोबत पण प्रेमाने वागतो. त्याच्यासोबत फ्रेन्डशिप (मैत्री) करतो.

**प्रश्नकर्ता :** पप्पा अथवा मम्मी माझ्यावर रागावलेत तेव्हा काय करायचे ?

**दादाश्री :** 'जयसच्चिदानंद' बोलायचे, 'सच्चिदानंद, सच्चिदानंद, सच्चिदानंद जयसच्चिदानंद' बोलायचे. असे बोलतात ना, तर ते शांत होऊन जातील.

पप्पा, मम्मीच्या बरोबर भांडण करायला लागलेत तेव्हा सर्व मुलांनी

'सच्चिदानंद, सच्चिदानंद' म्हटले तर त्यामुळे सर्व बंद होऊन जाईल. बिचाऱ्या दोघांना लाज वाटेल! धोक्याची घंटा वाजवली तर त्वरित बंद होऊन जाते.

आता तुझ्यामुळे घरातील सर्व लोकांना आनंद होईल असे वागायचे. तुला त्यांच्यामुळे दु:ख झाले तर समभावाने निकाल करायचा. आणि तुझ्यामुळे सर्वांना आनंद होईल असे वागायचे. मग तू त्या लोकांचे प्रेम पहा, कसे प्रेम आहे ते पहा! हे तर तू त्यांच्या प्रेमाला ब्रेकडाउन करतो, तोडून टाकतो. त्या लोकांचे प्रेम आहे आणि तू मात्र त्यावर दगड टाकत राहिलास तर सर्व प्रेम तुटून जाईल.

**प्रश्नकर्ता :** तर वृद्धच का जास्त गरम होत असतात ?

**दादाश्री :** ही तर खटारा गाडी होऊन गेली आहे, जर गाडी जुनी झाली असेल तर नेहमी गरम होते. पण नवीन गाडी असेल ना तर ती गरम होत नाही. म्हणून वृद्धांचे बिचाऱ्यांचे काय...(वय झाल्यामुळे नवीनपिढीसोबत एडजस्टमेन्ट घेऊ शकत नाही आणि त्यामुळे संघर्ष होत राहतो.)

आणि गाडी गरम झाली तर आपण तिला थंड करायला नको का? बाहेर कोणाबरोबर काही भानगड झाली असेल, रस्त्यात पोलीसांसोबत, तेव्हा चेहरा इमोशनल (भावूक) झालेला असतो. त्यावेळी तुम्ही असा चेहरा पाहिला तर काय म्हणाल? 'जेव्हा पहावे तेव्हा तुमचा चेहरा उतरलेलाच दिसतो, नेहमीच लटकलेला.' असे नाही बोलायचे. आपण समजून घ्यायला हवे की कुठल्या तरी अडचणीत सापडलेले आहेत. तेव्हा मग आपण गाडी थंड होण्यासाठी थांबवतो. नाही का ?

ह्या वडीलधाऱ्यांची सेवा करणे हा तर सर्वात मोठा धर्म आहे. तरूणपिढीचा धर्म काय? तर सांगतात, वडीलधाऱ्यांची सेवा करणे. जुन्या गाडीला ढकलून घेऊन जाणे, तरच मग आपण जेव्हा म्हातारे होऊ तेव्हा आपल्याला ढकलणारे मिळतील. हे तर देऊन घ्यायचे आहे. जर आपण वडीलधाऱ्यांची सेवा केली तर आपली सेवा करणारे येऊन मिळतील. आपण जर वडीलधाऱ्यांना धमकावत राहिलो तर आपल्याला पण धमकावणारे भेटतील. तर मग तुम्हाला जसे करायचे असेल, तसे करायची सुट आहे.

# १७. पत्नीची निवड

जी योजना झालेली आहे, त्यात काहीही बदल होणार नाही! जर लग्न करण्याची योजना झालेली आहे, तर मग आता आपण असे नक्की केले की, मला लग्न करायचे नाही, तर ती अर्थशून्य गोष्ट आहे. त्यात मग तुमचे काहीही चालणार नाही आणि लग्न तर करावेच लागेल.

**प्रश्नकर्ता :** ह्या जन्मात आपण ज्या भावना केल्या असतील, त्या पुढच्या जन्मात फळतील ना ?

**दादाश्री :** होय, ह्या जन्मात ज्या भावना केल्या, त्या पुढच्या जन्मात फळणार. परंतु आता मात्र त्यापासून सुटकाच नाही! वर्तमानात त्यात कोणाचेही चालत नाही ना! भगवंत जरी वळवायला गेलेना, की लग्न करू नको, तरी तेथे भगवंताचे सुद्धा चालणार नाही ! मागच्या जन्मात लग्न नाही करायचे अशी योजना केलीच नाही, म्हणून आता बिनलग्नाचा राहणे शक्य होत नाही. जी योजना केली असेल तीच येईल!

जसे शौच केल्याशिवाय कोणाचे नाही चालत, तसेच लग्न केल्याशिवाय सुद्धा चालेल असे नाही! तुझे मन कुमार असेल, तर हरकत नाही. पण जेथे मन विवाहित आहे, तेथे लग्न केल्याशिवाय चालत नाही आणि कोणाच्या सहाऱ्या (सोबती) शिवाय माणूस राहू शकत. नाही. सहाऱ्याशिवाय कोण राहू शकतो ? तर फक्त 'ज्ञानीपुरूष' एकटेच, जेथे दुसरे कोणीच नसेल तेथे सुद्धा राहू शकतात, कारण की ते स्वतः निरालंब झालेले आहेत, कोणत्याही अवलंबनाची त्यांना गरजच नाही.

माणूस बिचारा सहाऱ्या शिवाय नाहीच जगू शकत. वीस लाख रूपयाचा मोठा बंगला असेल आणि रात्री एकट्याला झोपायला सांगितले तर ? त्याला सहारा पाहिजे. मनुष्याला सहारा पाहिजे, म्हणून तर लग्न करतात ना ? विवाह पद्धत काही चुकीची नाही आहे. तो निसर्गचा नियम आहे.

म्हणून लग्न करण्यात सहज प्रयत्न करायचा, मनात भावना ठेवायची की चांगले स्थळ मिळाले की लग्न करायचे आहे, नंतर मग ते स्टेशन आल्यावर उतरून जायचे. स्टेशन येण्यापूर्वीच धावपळ केली तर काय होईल... ? तुला त्या अगोदर धावपळ करायची आहे ?

**प्रश्नकर्ता :** नाही दादाजी, स्टेशन आल्यावर.

**दादाश्री :** हा... स्टेशनला आपली गरज आहे आणि आपल्याला स्टेशनची गरज! 'आम्हाला' एकट्यालाच स्टेशनची गरज आहे असे नाही. स्टेशनला सुद्धा आपली गरज आहे, हो की नाही?

**प्रश्नकर्ता :** आपल्या संघात जोडली जाणारी कुमार-कुमारिका लग्न करायचे नाही असे म्हणतात, तेव्हा आपण त्यांना खाजगीत काय उपदेश देता ?

**दादाश्री :** मी खाजगीत त्यांना लग्न करा असे सांगत असतो. की भाई, तुम्ही जर लग्न केले तर थोड्या-फार मुली कमी होतील आणि त्यांचा निवाडा होईल. तुम्ही लग्न करुन आलात तरी पण माझी काही हरकत नाही. हा आमचा मोक्ष मार्ग विवाहितांसाठीच आहे. मी तर त्यांना सांगतो की लग्न कराल तर मुली कमी होतील आणि येथे लग्न केल्यामुळे मोक्ष अटकेल असे काही आहे!

परंतु त्यांनी काय शोधून काढले की लग्न केल्याने खूप भानगडी उभ्या राहतात. ते सांगतात, 'की आम्ही आमच्या आई-वडीलांचे सुख ( !) पाहिले आहे. म्हणून असे सुख ( !) आम्हाला आवडत नाही.' म्हणजे स्वतःच्या आई-वडीलांच्या सुखाचे दाखले देतात. आजकाल आई-वडीलांची भांडणे मुले घरात पहातातच आणि त्यामुळे ते कंटाळलेले असतात.

मुलावर दबाव घालू नका. नाहीतर तुमच्या माथी येईल की माझ्या वडीलांनी बिघडवले. त्याला निभावता येत नसल्यामुळे त्याचे बिघडत असते पण आळ मात्र तुमच्यावर येईल.

त्यांना बोलवून सांगा, 'आम्हाला मुलगी पसंत आहे, आता तुला जर मुलगी पसंत असेल तर सांग आणि पसंत नसेल तर आपण आता रद्द करूया.' तेव्हा जर मुलगा म्हणाला, 'मला पसंत नाही.' तर ते स्थळ सोडून द्या. मुलाची स्विकृती अवश्य करा, नाहीतर मुलगा पण विरूद्ध होईल.

**प्रश्नकर्ता :** लव मॅरेज (प्रेम विवाह) पाप गणले जाते?

**दादाश्री :** नाही, टेम्परी (तात्पूरते) लव मॅरेज असेल तर ते पाप मानले जाईल. परमनेन्ट (कायमसाठी) लव मॅरेज असेल तर ते पाप म्हटले जाणार नाही. अर्थात् ते लाईफ लाँग (जीवनभर) लव मॅरेज असेल तर त्याची हरकत नाही. टेम्परी लव मॅरेज अर्थात् एक-दोन वर्षापुरतेच लग्न करतात. लग्न करायचे तर एका बरोबरच लग्न करायचे. स्वतःच्या पत्नीशिवाय दुसऱ्या कोणाहीसोबत जास्त फ्रेन्डशिप ठेऊ नका नाहीतर नरकात जावे लागेल.

सुरूवातीलाच जर वडील म्हणालेत की, 'हे लफडे कशाला सुरू केले ?' त्यावर मुलगा उलट-सुलट बोलू लागला. तेव्हा मग त्याचे वडील समजून गेले की, 'त्याचा त्याला स्वतःलाच अनुभव घेऊ द्यावा! आमचा अनुभव स्विकारायला तयार नाही. तेव्हा मग त्याला स्वतःलाच अनुभव घेऊ देऊया!' नंतर जेव्हा तो तिला दुसऱ्याच्या सोबत सिनेमा पाहताना बघेल ना! तेव्हा अनुभव होईल! मग पश्चाताप करेल की वडील सांगत होते, ती गोष्ट बरोबर होती. हा तर लफडाच आहे.

**प्रश्नकर्ता :** मोह आणि प्रेममधील भेदरेषा काय आहे?

**दादाश्री :** हा जो पतंग आहे ना ते दिव्यावर सारखी झडप मारतो आणि स्वतःची आहुती देतो ना ? तो स्वतःचे जीवन संपवून टाकतो. यास 'मोह' म्हणतात. पण प्रेम नेहमी टिकून असते, तसे तर त्यातही थोड्या आसक्तिचे दुःख असते. पण तरीही ते प्रेम टिकाऊ असते म्हणून ते मोह नाही.

येथे (चेहऱ्यावर) बारा महिन्यांपासून फोड आला असेल ना, तर तोंड सुद्धा बघत नाही आणि, मोह सुटून जातो. जर खरे प्रेम असेल तर एकच काय, पण दोन फोड असते तरी सुद्धा प्रेम कमी झाले नसते. म्हणून असे खरे प्रेम शोधून काढा. अन्यथा लग्नच करू नका. नाहीतर फसाल. नंतर जेव्हा ती तोंड फुगवून बसेल तेव्हा म्हणाल, 'मला हिचे तोंड पहायला आवडत नाही.' अरे, पण तु जेव्हा तिला पहायला गेला होता तेव्हा तर तोंड आवडले होते, म्हणून तर पसंत पडली होती आणि आता ही पसंत नाही. हे तर गोडगोड बोलत असेल तर आवडेल आणि कटू बोलत असेल तर म्हणेल, 'मला तुझ्यासोबत रहायला आवडतच नाही !'

**प्रश्नकर्ता :** 'डेटिंग' सुरू झाले असेल तर ते कसे बंद करावे?

**दादाश्री :** ते थांबवायचे. आताच नक्की करा की हे थांबवायचे आहे. आपण सांगितले की येथे तुझी फसवणूक होत आहे, तर असे फसणे लगेच थांबव. पुन्हा असे फसू नये. जेव्हा जाग आली तेव्हापासून सकाळ. जेव्हा लक्षात आले की हे चुकीचे होत आहे तर ते थांबवायला हवे.

वाइल्ड लाइफ (असंस्कृत जीवन) असू नये, इन्डियन लाइफ (सुसंकृत जीवन) असले पाहिजे.

तुम्ही निर्मळ असाल तर तुम्हाला पत्नी पण निर्मळ मिळेल. त्याचेच नांव 'व्यवस्थित', जे तंतोतंत असते.

**प्रश्नकर्ता :** कोणतीही मुलगी चालेल, मी कलर-वलर काही नाही मानत. जी मुलगी चांगली असेल, अमेरिकन असो किंवा इंडियन असो, त्यास माझी हरकत नाही.

**दादाश्री :** पण असे आहे ना, अमेरिकन आंब्यात आणि आपल्या आंब्यात फरक असतो, हे तुला माहित नाही ? काय फरक असतो आपल्या आंब्यात ?

**प्रश्नकर्ता :** आपले गोड असतात.

**दादाश्री :** हो, तर मग पहा ना. ती गोड चाखून तर पहा, आपल्या इंडियनची.

**प्रश्नकर्ता :** अजून चाखली नाही.

**दादाश्री :** नाही, पण तिच्यात फसू नकोस! अमेरिकनमध्ये फसण्यासारखे नाही. तुझ्या मम्मी आणि पप्पांना तर तू पाहिलेस ना? तर त्या दोघात कधी मतभेद होतात की नाही होत?

**प्रश्नकर्ता :** मतभेद तर होतच असतात.

**दादाश्री :** हो, तरीही त्यावेळी तुझी मम्मी घर सोडून निघून गेली का कधी?

**प्रश्नकर्ता :** नाही, नाही.

**दादाश्री :** आणि ती अमेरिकन तर 'यू यू' करुन अशी बंदूक दाखवत निघून जाते आणि ही तर संपूर्ण जीवन आपल्या सोबतच रहाते. म्हणून आम्ही तुला समजावतो की भाई, असे करू नकोस, त्याबाजूला वळलास तर पश्चाताप होईल. ही इंडियन तर शेवटपर्यंत सोबतच रहाते, हो.... रात्री भांडण केले तरी सकाळपर्यंत रिपेअर (दुरुस्त) होऊन जाते.

**प्रश्नकर्ता :** गोष्ट खरी आहे.

**दादाश्री :** म्हणून आता नक्की करुन टाक की मला भारतीय मुलीशी विवाह करायचा आहे. इंडियनमध्ये तुला जी पसंत असेल ती, ब्राह्मण, वाणी जी तुला चांगली वाटेल, त्यास हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** आपल्या जातीतच लग्न करण्यात काय फायदा आहे, हे जरा सांगा.

**दादाश्री :** आपल्या कॉम्युनिटीची (जातीची) पत्नी असेल तर आपल्या स्वभावाशी जुळणारी असेल. आपण खायला कंसार घेतले असेल आणि आपल्या लोकांना तर त्यावर तूप जास्त हवे असते. परंतु जर आपण दुसऱ्या जातीच्या मुलीला लग्न करुन आणले असेल, तर ती जास्त तूप वाढणार नाही, असे तुपाचे भांडे खाली वाकवून तूप वाढण्यात तिचे हात दुखतील. अर्थात् तिच्या भिन्न स्वभावशी दिवसभर संघर्ष करावा लागेल. पण जर आपल्या जातीची असेल तर तिच्यासोबत असे काही घडणार नाही. समजले ना ? आणि ती भाषा बोलेल ना, ती भाषा सुद्धा सफाईदार बोलेल आणि आपले दोष काढत बसेल की तुम्हाला चांगले बोलता येत नाही. तिच्या तुलनेत आपली (भारतीय स्त्री) चांगली की, काही बोलणार तर नाही, आणि आपल्याला सुनावणार पण नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण सांगता की, आपल्या जातीची असेल तेथे भांडण होत नाही, परंतु आपल्या जातीची असेल, तेथे सुद्धा भांडणे होतातच, त्याचे कारण काय ?

**दादाश्री :** भांडणे तर होतात पण त्याचे समाधान सुद्धा होत असते.

तिच्यासोबत दिवसभर चांगले वाटते आणि दुसरी (विजातीय)च्या सोबत चांगले वाटत नाही. एखादा तास चांगले वाटते आणि मग कंटाळा येतो. ती आली की संताप होतो, कंटाळा येतो. आपल्या जातीची असेल तर आवडेल, नाहीतर आवडतच नाही. हे सर्व जे पस्तावलेले आहेत, त्यांची उदाहरणे देऊन सांगतो आहे. हे सर्व खूप फसले गेले होते. खूपच वाईट प्रकारे फसले गेले होते.

आता तर आंतरजातीय विवाह करण्यास हरकत नाही आहे, पूर्वीच्या काळात थोडा त्रास होता.

**प्रश्नकर्ता :** आपल्या हातात कुठे आहे ? आपल्या हातात तर नाही आहे ना, अमेरिकन पत्नी येईल की नाही ते ?

**दादाश्री :** हातात नाही, तरी देखिल अशी डोळेझाक करुन थोडी चालणार आहे ? तुम्हाला सांगावे तर लागेल ना, 'ऐक बेटा! तू त्या अमेरिकन मुलीसोबत फिरू नकोस ! ते आपले काम नाही.' असे-तसे वर वर ओरडायचे तर त्याचा परिणाम होईल. नाहीतर त्याला असेच वाटत राहिल की हिच्यासोबत फिरतो तसेच तिच्यासोबत पण फिरायचे. म्हणून त्याला सांगायला काय हरकत आहे ? आणि परिसर जर वाईट असेल ना, वाईट परिसर इंडियामध्ये असतात ना, तर तेथे बोर्ड लावतात, 'बिअवेर ऑफ थीव्स्',(चोरांपासून सावध रहा.) असे बोर्ड का लावतात? तर ज्यांना सावध व्हायचे आहे ते सावध होऊन जातात. असे शब्द उपयोगी पडतात की नाही? काय, समजले की नाही तुला?

वडीलांच्या पक्षाला कुळ म्हणतात आणि आईच्या-पक्षाला जाती म्हणतात. जाती आणि कुळाचे मिश्रण झाल्यावर संस्कार घडतात. फक्त जाती आहे आणि कुळ नसेल तरी संस्कार घडत नाही. फक्त कुळ आहे आणि जाती नसेल तरीही संस्कार घडत नाहीत. जाती आणि कुळ या दोन्हींचे मिश्रण एक्झेक्टनेस (यथार्थपणे) असेल तरच संस्कारी मनुष्य जन्मतात.

जाती आणि कुळ हे दोन्ही पक्ष चांगले जुळून आले तरच लग्नाच्या बोलणीसाढी पुढे जायचे, या व्यतिरिक्त दुसऱ्या गोष्टीत पुढे जाण्यास योग्य नाही.

अर्थात् आई जातीवान असायला हवी आणि वडील कुळवान हवेत. मग त्यांची अपत्य खूपच उच्च प्रतीची असतात. जातीत विपरीत गुण नसतील आणि वडीलांमध्ये कुळवान प्रजेचे गुण असतील. कुळाच्या थाटामुळे मग ते दुसऱ्यांसाठी झिजतात. लोकांसाठी खपतात. खूपच उच्च कुळवान कोण? दोन्ही बाजूने नुकसान सहन करतात, घेण्याच्यावेळी सुद्धा आणि देण्याच्यावेळी सुद्धा. नाहीतर जगातील कुळवान कोणत्या प्रकारचे असतात? एका बाजूनेच नुकसान सहन करतात. जसे घेताना संपूर्ण घेतात परंतु देताना मात्र जरा जास्तच देतात. तोळाभर जास्तच देतात. लोक चाळीस तोळा देतात, पण हा स्वतः एक्केचाळीस तोळा देतो. त्याही पुढे डबल कुळवान कोणास म्हणणार ? स्वतःसाठी एकोणचाळीस (३९) तोळा घेतात, अर्थात् एक तोळा कमीच घेतात आणि देतांना समोरून एक तोळा जास्तीचा देतात, अशा लोकांना डबल कुळवान म्हणतात. दोन्ही बाजूकडून झिजतात (नुकसान सहन करतात) तर ते कमी का घेतात? कारण समोरचा आधीच स्वतःच्या दुःखाने दुःखी आहे, त्यामुळे जावू देतात! त्याचे दुःख दूर करण्यासाठी! याबाजूने संवेदनशीलपणे (भावनेपोटी) वागतात आणि दुसऱ्याबाजूनेही संवेदनशीलपणे वागतात. अशा माणसांना पहातो तेव्हा मी काय म्हणतो माहित आहे? हे द्वापारयुगी (द्वापारयुगातील माणसे) आलेत.

जर आता उच्च कुळ मिळाले असेल आणि कुळाचा अहंकार केला, तर दुसऱ्यावेळी त्याला खालच्या दर्जाचे कुळ मिळते आणि नम्रता ठेवली तर उच्च कुळात जन्म घेतो. ही आपलीच शिकवण आहे, आपलीच पेरणी आहे. असे गुण आपल्याला प्राप्त करावे लागत नाही, सहजच प्राप्त होतात. उच्च कुळात जन्म झाल्यावर आपल्याला जन्मापासून सर्व प्रकारचे चांगले संस्कार प्राप्त होतात.

हे सर्व व्यवहारात उपयोगी पडणाऱ्या गोष्टी आहेत, ह्या ज्ञानाच्या गोष्टी नाहीत. तरीपण व्यवहारात तर त्या हव्यात ना!

**प्रश्नकर्ता :** दादाजी, आपण सांगितलेले बरोबर आहे, पण ज्ञानाच्या शिखरापर्यंत पोहचण्या आधि तर आम्ही व्यवहारातच आहोत. तर व्यवहारात सुद्धा ज्ञानाच्या ह्या सर्व गोष्टी उपयोगी पडणारच ना?

**दादाश्री :** हो, उपयोगी पडतात ना! व्यवहार पण चांगला चालतो. 'ज्ञानीपुरूषाची' विशेषता असते. 'ज्ञानीपुरूषाजवळ' बोधकला आणि ज्ञानकला दोन्हीही असतात. बोधकला आंतरिक सुझने उत्पन्न झाली आहे आणि ज्ञानकला ज्ञानाने उत्पन्न झाली आहे म्हणून तेथे (ज्ञानीपुरूषांजवळ) आपले निरसन होतो. कधीतरी अशी बातचीत करायला काय हरकत आहे ? त्यात आपला काय नुकसान आहे? 'दादा' पण बसलेले असतात, त्यांची काही फी नसते. फी असेल तर हरकत होईल.

**प्रश्नकर्ता :** युवक आणि युवतींनी लग्न करण्यापूर्वी स्त्री किंवा पुरूष यांची निवड कशाप्रकारे करावी ? आणि काय करावे? काय पहावे? गुण कशाप्रकारे पहावे?

**दादाश्री :** ते जास्त पहाण्याची आवश्यकता नाही. युवक-युवतींनी पहायला जावे आणि जर आकर्षण झाले नाही तर बंद ठेवायचे. दुसऱ्या गोष्टी पहाण्याची आवश्यकता नाही. आकर्षण होते की नाही, एवढेच पहायचे.

**प्रश्नकर्ता :** कोणत्या प्रकारचे आकर्षण?

**दादाश्री :** ह्या डोळ्यांचे आकर्षण होते, आतून आकर्षण होते. बाजारात तुम्हाला काही वस्तू खरेदी करायची असेल, तेव्हा त्या वस्तूचे आकर्षण झाले नाही तर तुम्ही खरेदी करू शकत नाही. अर्थात् तिचा हिशोब असेल तरच आकर्षण होते. निसर्गाचा हिशोब असल्याशिवाय कोणताच विवाह होऊ शकत नाही. अर्थात् आकर्षण व्हायला हवे.

केवढी मोठी थट्टा! हा थट्टा-मस्करी करण्याचा काळ आहे, म्हणून स्त्रियांची मस्करी होत आहे. मुलगी पहायला जातो, तेव्हा मुलगा सांगतो... असे फिर, तसे फिर. इतकी थट्टा!

आजकाल तर मुले मुलींना पसंत करण्यापूर्वी बरीच काही चिकित्सा करुन निवड करतात. 'खूप उंच आहे, खूप ठेंगणी आहे, खूप जाड आहे, खूप बारीक आहे, थोडी काळी आहे' एक मुलगा असे बोलत होता, तर मी त्याला खडसावले. मी त्याला विचारले, 'तुझी आई पण वधू झाली होती. कोणत्या प्रकारचा माणूस आहे तू ?' स्त्रीचा असा घोर अपमान!

जर लोकांनी मला सांगितले की, दादा तुम्हाला सुट आहे, तुम्ही ह्या मुलाला जे काही बोलायचे असेल ते बोला. तो मुलगा पण म्हणाला की तुम्हाला जे काही सांगायचे असेल ते तुम्ही मला सांगू शकता, तर मी म्हणेल, मेल्या! ती काय म्हैस आहे की तुला अशाप्रकारे पाहतो आहेस. म्हशीला चारी बाजूने पहावे लागते, ह्या मुलीला पण?

मग ह्याचा बदला स्त्रिया केव्हा घेतात हे माहित आहे का? ही अशी थट्टा-मस्करी केली त्याचा परिणाम मुलांना काय मिळेल नंतर?

ही तर स्त्रियांची संख्या जास्त आहे, म्हणून बिचारींची किंमत कमी झाली आहे. निसर्गच असे करवतो. आता ह्याचे रिएक्शन केव्हा येईल ? बदला केव्हा मिळतो ? जेव्हा स्त्रियांची संख्या कमी होते आणि पुरुषांची संख्या वाढते. तेव्हा स्त्रिया काय करतात? स्वयंवर! अर्थात् ती एकुलती एक लग्नवधू आणि हे एकशे वीस पुरूष. स्वयंवरात सगळे फेटा-बीटा बांधून ऐटीत येतात आणि मिशांना असे पीळ देत असतात! तिची वाट पहात असतात की केव्हा मला वरमाळा घालणार! ती पहात पहात येते, हा समजतो मला वरमाळा घालेल, अशी मान पण पुढे करतो पण ती दाद सुद्धा देत नाही ना! मग जेव्हा तिचे हृदय आतून कोणी एकाशी एकाकार होते, आकर्षित होते, त्यालाच ती वरमाळा घालते. मग भले तो मिशींना पीळ देत असेल किंवा नसेल! तेव्हा मग (बाकीच्यांची) थट्टा-मस्करी होते. बाकीचे सगळे मूर्ख बनतात आणि असे तसे करुन निघून जातात मग. तर ही अशाप्रकारे थट्टा-मस्करी झाली होती, अशाप्रकारे बदला मिळतो मग!

आजकाल तर अगदी सौदाबाजी होऊन गेली आहे, सौदाबाजी! प्रेम कुठे राहिले, सौदाबाजीच होऊन गेली! तराजूत एकीकडे रूपये ठेवा आणि दुसरीकडे आमचा मुलगा, तरच लग्न होईल असे म्हणतात. एका तराजूत रूपये ठेवावे लागतात. तराजूच्या तोलावर मोजून मापून घेतात.

## १८. पती ची निवड

परवशता, निव्वळ परवशता! जेथे पहावे तेथे परवशता! वडील नेहमीसाठी मुलीस आपल्या घरी ठेवत नाही. म्हणतात, 'ती तिच्या सासरीच शोभते' परंतु सासरी तर सगळे फक्त तिचे दोष काढण्यासाठी, तिची टीका-

टीप्पणी करण्यासाठी फणा काढून टपलेले असतात. तू पण सासूला म्हणते, 'सासूबाई, तुमचे मी काय करु ? मला तर फक्त पती हवा होता ?' त्यावर सासू म्हणते, 'नाही पती एकटा थोडीच असतो, हे लष्कर तर येणारच सोबत. लष्कर सहित!

लग्न करण्यास हरकत नाही. लग्न करा परंतु समजून लग्न करा की, 'असेच निघणार आहे.' असे समजून मग लग्न करा. लग्न केल्याशिवाय सुटका नाहीच. काही मुली अशी भावना करुन आलेल्या असतात की, 'मला दीक्षा घ्यायची आहे किंवा मला ब्रह्मचर्य पाळायचे आहे' ती वेगळी गोष्ट आहे. परंतु बाकीच्यांना तर लग्न केल्याशिवाय सुटकाच नाही. म्हणून अगोदरच नक्की करुन मग लग्न करायचे की असे होणारच आहे तर मग काही भानगडच उरणार नाही, नंतर मग आश्चर्य ही वाटणार नाही. म्हणून आधी असे नक्की करुन मगच बस्तान मांडा. आणि जर सुखच आहे असेच मानून लग्न केले तर मग नंतर उपाधिच वाटेल! विवाह हा तर दुःखाचा सागर आहे. सासूच्या घरात प्रवेश करणे ही काही सोपी गोष्ट आहे? आता नवरा एकटाच असेल असे तर क्वचितच घडेल की जर त्याच्या आई-वडीलांचे निधन झालेले असेल तरच.

सिविलाइज्ड (संस्कारी) लोक भांडत नसतात. रात्री दोघे झोपून जातात, भांडण नाही करत. जे अन्-सिविलाइज्ड (असंस्कारी) आहेत ना, ते भांडण करतात, क्लेश करतात.

**प्रश्नकर्ता :** आता आम्ही अमेरिकन मुलांच्या सोबत पार्टीत जात नाही. कारण की त्या पार्टीत खाणे-पिणे (मांसाहार-दारू) सर्वच असते. म्हणून आम्ही त्या लोकांच्या पार्टीत जात नाही, पण इंडियन मुले जेव्हा पार्टी ठेवतात तेव्हा आम्ही जातो आणि त्यात आमचे सर्वांचे मम्मी-पप्पा एकमेकांना ओळखत असतात.

**दादाश्री :** परंतु त्यात फायदा काय होतो.

**प्रश्नकर्ता :** एन्जोयमेन्ट, मजा येते!

**दादाश्री :** एन्जोयमेन्ट !! खाण्यात तर खूप एन्जोयमेन्ट होत असते,

परंतु खाण्याच्यावेळी काय करायला हवे ? त्यावर कंट्रोल ठेवाचला हवा की भाई, तुला एवढेच मिळेल. मग तो हळू-हळू एन्जोय करत करत खातो. पण तुम्ही तर जास्त सुट देता ना त्यामुळे एन्जोय करता येत नाही. म्हणून मग दुसरीकडे एन्जोयमेन्ट शोधतात. अर्थात् प्रथम खाण्यात कंट्रोल करायला हवा की पुरे, आता एवढेच मिळेल, जास्त मिळणार नाही.

**प्रश्नकर्ता :** आम्ही आमच्या मुला-मुलींना अशा पार्टीत जाऊ द्यायचे का? अशा पार्टीज्ला वर्षातून किती वेळा जाऊ द्यायचे?

**दादाश्री :** असे आहे ना मुलींना त्यांच्या आई-वडीलांच्या सांगण्यानुसार वागायला हवे. आपल्या अनुभवी लोकांचा शोध आहे की मुलींना नेहमी त्यांच्या आई-वडीलांच्या सांगण्यानुसार वागायला हवे. लग्नानंतर पतीच्या सांगण्यानुसार वागायला हवे. पण आपल्या मर्जीनुसार वागयला नको. असे आपल्या अनुभवींचे सांगणे आहे.

**प्रश्नकर्ता :** मुलांनी आई-वडीलांच्या सांगण्यानुसार वागायला हवे की नाही?

**दादाश्री :** मुलांनी पण आई-वडीलांच्या सांगण्यानुसार वागायला हवे, परंतु मुलांना थोडीशी ढील दिली तरी चालते! कारण मुलांना रात्री बारा वाजता जायला सांगितले तर एकटा जाईल, त्यास हरकत नाही, परंतु तुला रात्री बारा वाजता एकटीला जायला सांगितले तर एकटी जाणार का?

**प्रश्नकर्ता :** नाही जाऊ शकणार, भिती वाटते.

**दादाश्री :** आणि मुलगा असेल तर हरकत नाही, म्हणून मुलांना सवलत जास्त असायला हवी आणि मुलींना सवलत कमी द्यायला हवी, कारण तू रात्री बारा वाजता जाऊ शकत नाही.

अर्थात् हे तुमच्या भविष्याच्या सुखासाठी सांगतात. भविष्याच्या सुखासाठी मुलींना मनाई करतात. तुम्ही जर आताच या सर्व भानगडीत पडलात तर तुम्ही तुमचे भविष्य बिघडवून टाकाल. तुमच्या भविष्यातील सुख नाहीसे होईल. तुमचे भविष्य बिघडू नये याकरिता ते तुम्हाला सांगत असतात की, 'बिवेर, बिवेर, बिवेर (सावधान, सावधान, सावधान).'

**प्रश्नकर्ता :** आमच्या हिन्दु फेमिलीत सांगतात, 'मुलगी परक्याच्या घरी निघून जाईल आणि मुलगा कमाई करुन पोसणारा आहे, आम्हाला सांभाळणारा आहे.' (सहारा होणार) अशाप्रकारच्या अपेक्षा, असा दृष्टीकोन ठेवून कुटुंबातील लोक मुलींवर प्रेम ठेवत नाहीत, तर हे काय ठीक आहे?

**दादाश्री :** प्रेम नाही ठेवत, अशी तक्रार करणारी स्वतःच चुकीची ठरते, ही तक्रारच चुकीची आहे. हीच अज्ञानता आहे! प्रेम ठेवत नाही असे कुठलेही आई-वडील नसतातच. हीच तर समज तिला नाही, तर मग काय होईल? प्रेम नाही ठेवत असे म्हटल्यावर आई-वडीलांना किती दुःख होईल की, जर तुझ्याशी प्रेम नाही ठेवायचे होते तर मग लहानपणापासून तुझे पालण-पोषण केले ते कशासाठी?

**प्रश्नकर्ता :** तर मग मला असे का वाटते की आई-वडील मला प्रेम नाही करत? माझी दृष्टी अशी का झाली?

**दादाश्री :** नाही, सगळे असेच प्रश्न उभे करतात, काय करायचे त्याचे? लहान असती तर दमदाटी करुन गप्प बसवले असते, पण आता तू मोठी झाली, तेव्हा करणार तरी काय?

आता आमच्या लक्षात आले, की तिला ही जी अक्कल आली आहे, बाहेरून बुद्धि मिळाली आहे ना ती विपरीत बुद्धि आहे. म्हणून ती स्वतः पण दुःखी होते आणि दुसऱ्यांना पण दुःखी करते.

**प्रश्नकर्ता :** होय, आजकाल मुलीसुद्धा लवकर लग्न करायला तयार नसतात!

**दादाश्री :** मुली लवकर लग्न करायला तयार नसतात. परंतु होत असेल तर लवकर लग्न झालेले बरे. इकडे शिक्षण पूर्ण झाले आणि तिकडे लग्न होऊन गेले, असे झाले तर उत्तम. दोन्हीही एकाच वेळी व्हावेत. किंवा लग्नानंतर एखाद वर्षात शिक्षण पूर्ण होत असेल तरी हरकत नाही. परंतु लग्नबंधन होऊन जायला हवे, तर 'लाइफ' (जीवन) चांगले जाईल, अन्यथा नंतर लाइफ खूप दुःखदायी होते.

फ्रेन्ड वर मोह म्हणजे मैत्रिणीची गोष्ट करतेस की मित्राची?

**प्रश्नकर्ता :** नाही, दोघांची.

**दादाश्री :** मित्र सुद्धा! तो सुद्धा मिशीवाला!

**प्रश्नकर्ता :** होय. दोन्ही.

**दादाश्री :** ठीक आहे. तर त्याच्याशी आपण समभावाने रहायचे. त्यावेळी तुझी जागृति रहायला हवी. त्यावेळी भान हरवायला नको. ज्यांना ब्रह्मचर्य पाळायचे आहे, ज्यांना मोक्ष हवा आहे, त्या स्त्रियांनी पुरुषांचा परिचय कमीत कमी ठेवला पाहिजे, ते सुद्धा अनिवार्य परिस्थीतीतच. ज्यांना मोक्षात जायचे आहे, त्यानी एवढे सांभाळायला हवे. असे तुला वाटते की नाही वाटत ? तुला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** होय, सांभाळायला हवे.

**दादाश्री :** की मग सध्या मोक्षाला जायचे नाही? चालेल का तसे?

**प्रश्नकर्ता :** नाही, मोक्षाला तर जायचे आहे.

**दादाश्री :** तर मग पुरूषांसोबत मैत्री ठेऊन काय करायचे आहे? हा तर सर्व उष्टवलेला माल आहे. स्त्रियांसोबत फिरायचे, खायचे-प्यायचे, निवांतपणे मजा करायची, परंतु पुरूषांसोबत नाही.

**प्रश्नकर्ता :** दादाजी, एक मुलगी विचारते की आपले मुलांच्या सोबत फक्त 'फ्रेन्डली रिलेशन' (मैत्री संबंध) असेल, तरी सुद्धा आई-वडील शंका का करतात?

**दादाश्री :** नाही, मुलांसोबत 'फ्रेन्डली रिलेशन' ठेऊच नये. मुलांसोबत 'फ्रेन्डली रिलेशन' हा गुन्हा आहे.

**प्रश्नकर्ता :** यात काय गुन्हा आहे?

**दादाश्री :** पेट्रोल आणि अग्नि दोन्ही सोबत ठेऊ शकत नाही ना ? ते दोघे (मुलगा आणि मुलगी) संधी शोधत असतात. ती असे विचार करते की, केव्हा माझ्या तावडीत सापडतो आणि तो सुद्धा तसाच विचार करतो की केव्हा माझ्या तावडीत सापडते? दोघेही शिकाराच्या शोधातच असतात, म्हणून दोघेही शिकारीच म्हणायचे!

**प्रश्नकर्ता :** आपण सांगितले की मुला मुलींनी एकमेकांशी मैत्री करु नये.

**दादाश्री :** नाही, अजिबात करायला नको.

**प्रश्नकर्ता :** अजिबात करायला नको असे सांगितले त्या मुळे ह्यांना संतोष झाला नाही.

**दादाश्री :** ही फ्रेन्डशिप शेवटी पोईझन बनेल, शेवटी पोईझनच होईल, मुलीला जीव देण्याची वेळ येते, मुलाचे काही जात नाही. म्हणून मुलांसोबत उभे देखिल राहू नये. मुलांच्या सोबत फ्रेन्डशिप करुच नये. कारण ते पोईझन आहे. लाख रूपये दिले तरी फ्रेन्डशिप करु नये. कारण शेवटी विष खाऊन मरावे लागते. किती तरी मुली विष खाऊन मरतात.

म्हणून वय झाल्यावर आपण घरात आई-वडीलांना सांगून टाकायचे की, एखाद्या चांगला मुलगा पाहून माझे संबंध जोडून द्या, पुन्हा संबंध तुटणार नाहीत अशा ठिकाणी जुळवून द्या. माझ्या लग्नासाठी आता मुलगा शोधा. दादा भगवानांनी मला सांगितले आहे की तु तसे आई-वडीलांना सांग. तर असे त्यांना सांगावे. त्यात लाजायचे नाही. तेव्हा मग त्यांना कळेल की आता मुलीची खुशी आहे, तर लग्न करुन देऊ. आधी समोरासमोर पसंती करुन लग्न जुळवायचे नंतर दोन वर्षानी लग्न करायचे एकदा लग्न ठरल्यावर कोणी आपल्याकडे तसे पाहणार नाही. म्हणेल की हिचे तर ठरले आहे.

ही मैत्री चांगली नाही, लोक तर दगा-फटका करणारे असतात. मैत्रीणींसोबत मैत्री करु शकते, पण पुरूषासोबत मैत्री करायची नाही. धोका देऊन निघून जातात सर्व. कोणी विश्वास करण्यायोग्य नाही, सगळे धोकेबाज, एकसुद्धा खरा नाही आहे. बाहेर कोणाचा विश्वास ठेऊ नका.

लग्न करुन घेतलेले चांगले, असे इकडे-तिकडे भटकत राहण्यात हाती काहीही येणार नाही. तुझे आई-वडील लग्न बंधनात आहेत, तर आहे का काही भानगड ? असे तुला सुद्धा लग्न बंधनात बांधून घ्यायला आवडेल की नाही ? खुट्याला बांधून (लग्नबेडीत अडकून) घ्यायला तुला आवडत नाही ? मुक्त रहायला आवडते ?

मुलींना विचारतो की लग्न का करीत नाही ? तेव्हा सांगतात, ‘काय दादाजी, तुम्ही पण आम्हाला लग्न करायला सांगतात !’ तेव्हा मी सांगतो, ‘ह्या जगात लग्न केल्याशिवाय गत्यंतर नाही किंवा मग ब्रह्मचर्य पाळायचे आहे असे ठरवा आणि ते सुद्धा एकदम पक्के, ठाम ठरवलेले असले पाहिजे. असे जर होत नसेल तर लग्न करुन घ्या. परंतु दोन्हींपैकी एकामध्ये येऊन जा.’ तेव्हा सांगतात, ‘कशाला लग्न करायला सांगता ?’ मी विचारले, का बरे ? त्यात काय अडचण आहे ? कोणी चांगला मुलगा मिळत नाही ? तर म्हणाली, ‘चांगली मुले कुठे आहेत ? बावळट आहेत, अश्या बावळटांबरोबर कशाला लग्न करायचे ?’ हे ऐकून मी स्तब्ध झालो. मी म्हणालो, ‘ह्या मुली कश्या आहेत ? पहा तर, आतापासून ह्यांची एवढी पावर आहे, तर मग नंतर त्याला कसे जगू देतील, बिचाऱ्यांना ?’ म्हणून बरीच मुले मला सांगतात, ‘आम्हाला लग्न करायचे नाही.’ मुली म्हणतात, ‘बावळटा बरोबर का लग्न करू ?’ मी सांगितले,‘ असे बोलू नकोस. तो बावळट आहे हे तुझ्या मनातून काढून टाक. कारण की लग्न केल्याशिवाय तर सुटका च नाही.’ असे नाही चालत. मनात बावळट आहे असे घुसले तर मग नेहमी भांडणे होतील. तुला तो नेहमी बावळटच वाटत राहणार.

संपूर्ण जग मोक्षाकडेच जात आहे, परंतु मोक्षासाठी हे सगळे हेल्पिंग (सहाय्यक) होत नाही. अशी भांडणे करुन उलट ब्रेक लावतात. नाहीतर उष्णतेचा असा स्वभाव आहे की ती पाऊस खेचून आणते. जेथे कुठे असेल तेथून खेचून आणते. उष्णतेचा स्वभाव आहे, वाढत वाढत जायचे आणि पाऊसाला खेचून आणायचे. अर्थात् हे जग घाबरुन जाण्यासारखे नाही आहे.

संसाराचा स्वभाव असा आहे की आपणास मोक्षाकडे घेऊन जातो. मोक्षला खेचून आणतो. संसार जेवढा जास्त कठीण असेल ना, तेवढा मोक्ष लवकर येतो. परंतु जेव्हा कठीण असेल तेव्हा आपण खचून जायला नको. स्थिर रहायला हवे. योग्य उपाय करण्यासारखे आहेत. चुकीचे उपाय केल्यामुळे मग पडायला होते. दुःख आल्यावर एवढेच समजायचे की माझ्या आत्म्यासाठी विटामिन मिळाले आहे. आणि सुख मिळाले तर देहाला विटामिन मिळाले, अश्या प्रकारे चालायचे. आपल्याला दररोज विटामिन मिळत असते, आम्ही तर असे मानून लहानपणापासून निवांत राहिलो होतो.

तुम्ही तर एकाच प्रकारच्या विटामिनला विटामिन म्हणता, ते बुद्धिचे विटामिन आहे. परंतु ज्ञान तर दोघांना विटामिन म्हणते. ते विटामिन चांगले की खूप काही खाण्यास उपलब्ध असले, तरी सुद्धा लोक तप करतात. चविष्ट भाजी-बीजी सर्व काही असेल, तरी सुद्धा लोक तप करतात. तप करतात म्हणजे दुःख भोगतात, कारण की आत्माचे विटामिन मिळावे म्हणून. हे असे तुमच्या ऐकण्यात आले नाही का?

**प्रश्नकर्ता :** होय, आले आहे दादाजी.

**दादाश्री :** आणि हे तप घरी बसल्या बसल्या आपणहून मिळते.

लव मॅरेज मात्र पसंत करण्यासारखी वस्तू नाही. उद्या त्याचा तोरा कसा निघेल कोणास ठाऊक? आई-वडील शोधतील त्याला तुम्ही पाहावे की तो मुलगा वेडपट अथवा डिफेक्टिव तर नाही ना? वेडपट असायला नको! वेडपट असतात का?

आपल्याला पसंत पडेल असा हवा. थोडासा आपल्या मनाला भावेल असा हवा. बुद्धिच्या लिमिटमध्ये यायला हवा. अहंकार स्विकारेल असा हवा आणि चित्त आकर्षित होईल असाही हवा ? चित्तला आकर्षित करेल असा हवा ना? अर्थात् आई-वडील शोधतील त्यास काही हरकत नाही, परंतु आपण स्वतः सुद्धा पाहून घ्यायला हवे.

**प्रश्नकर्ता :** कधी-कधी आई-वडील सुद्धा मुलगा शोधण्यात चुक करू शकतात?

**दादाश्री :** त्यांचा हेतू तसा नसतो, त्यांचा हेतू तर भलं करण्याचाच असतो. त्यातूनही चुक झाली तर ते आपल्या प्रारब्धाचा खेळ आहे. काय करणार? आणि तुम्ही जे स्वतंत्रपणे शोधता त्यात तर चुक होण्याची शक्यता जास्त आहे. बरीच अशी फेल झाल्याची उदाहरणे आहेत.

आपले ज्ञान घेतलेले एक महात्मा होते, त्यांचा एकुलताएक मुलगा होता. मी त्याला विचारले, 'अरे! तुला लग्न करायचे आहे की नाही?' तो म्हणाला, 'करणार दादाजी.' 'कशी मुलगी पसंत करणार?' तेव्हा म्हणाला, 'आपण सांगाल तसे करणार.' मग स्वतःहूनच म्हणाला, 'माझी आई तर

मुलगी पसंत करण्यात हुशार आहे.' त्या लोकांनी आपआपसात ठरवले होते की आई जी पसंत करेल तीच. तर अशाप्रकारे सर्व असायला हवे.

**प्रश्नकर्ता :** माझी ही लहान मुलगी विचारते की, असे कसे लग्न करायचे. मग तर आपले संपूर्ण जीवनच बिघडून जाईल ना? त्यामुळे आधीच मुलाला चांगल्या प्रकारे पहायचे आणि माहिती करुन घ्यायची की, मुलगा चांगला आहे की नाही, नंतर लग्न करायचे ना ! असे ती मला प्रश्न विचारते. तर यावर उपाय काय आहे दादाजी?

**दादाश्री :** सर्व पाहूनच लग्न करतात तरीही नंतर भांडण हाणामारी होतेच. ज्यांनी न पहाता लग्न केले, त्यांचे खूप चांगले चालते कारण की ते निसर्गाने दिले आहे पण तेथे तर आपली हुशारी वापरली ना.

आपल्या एक महात्माच्या मुलीने काय केले? तर तिने आपल्या वडीलांना सांगितले की, 'मला हा मुलगा पसंत नाही.' आता मुलगा शिकला-सवरलेला होता. मुलीच्या आई-वडीलांना सर्वांना तो मुलगा खूपच पसंत होता. म्हणून तिचे वडील व्याकूळ झाले, कारण मोठ्या प्रयासाने असा चांगला मुलगा मिळाला होता आणि त्याला ही मुलगी नाकारते आहे.

थकलेला माणूस मग सावलीखाली बसतो, तसे त्यांनी मला हे सर्व सांगितले त्यावर मी म्हणालो. 'त्या मुलीला माझ्या जवळ आणा.' मी विचारले, 'बेटा, मला सांग की ह्या स्थळाला तुझी काय हरकत आहे? मुलगा, उंच वाटतो आहे? जाडलठ्ठ आहे? किडमिडी आहे?' तेव्हा म्हणाली, 'नाही, थोडा ब्लॅकीश (काळा-सावळा) आहे.' मी म्हणालो 'ते तर मी उजळून देईन, अजून काही तुला अडचण आहे ?' तर म्हणाली, 'नाही, अजून काही नाही.' यावर मी सांगितले, 'तू होकार कळवून दे ना! नंतर मी त्याला उजळून टाकेन.' त्यानंतर मुलगी तिच्या वडीलांना म्हणाली, 'तुम्ही दादाजींपर्यंत माझी तक्रार घेऊन गेलात?' तेव्हा काय करणार मग?

लग्नानंतर मी त्या ताईला विचारले, 'काय ताई, त्याला उजळवण्यासाठी साबण मागवून देऊ का?' तेव्हा ती म्हणाली, 'नाही दादाजी, उजळच आहे.' विनाकारण ब्लॅकिश, ब्लॅकिश करत होती! ते तर काही काळे लावले तर काळा दिसेल आणि पिवळा लावला तर पिवळा दिसेल! खरे तर मुलगा

चांगला होता. मला पण चांगला वाटला. त्याला कसे जाऊ देऊ? मुलगी काय समजली, थोडासा ढिला आहे. तर ठीक करुन घे ना नंतर, परंतु असा दुसरा मिळणार नाही!!

**प्रश्नकर्ता :** डेटिंग करणे पाप आहे का? डेटिंग म्हणजे मुलांनी मुलींच्या सोबत बाहेर जाणे आणि मुलींनी मुलांच्या सोबत बाहेर जाणे, तर हे पाप आहे? त्याला काही हरकत आहे?

**दादाश्री :** होय. मुलांच्या सोबत फिरायची इच्छा होत असेल तर लग्न करुन घ्यायचे. नंतर एकच मुलगा पसंत करायचा, एक नक्की करुन टाकायचा. नाहीतर अश्याप्रकारचा गुन्हा करायचा नाही. जोपर्यंत लग्न होत नाही, तोपर्यंत तू मुलांच्या सोबत फिरायला नको.

**प्रश्नकर्ता :** येथे अमेरिकेत तर असे आहे की, मुले-मुली चौदा वर्षाची झाल्यावर बाहेर फिरायला जातात. नंतर मग जमले तर पुढे ही जातात. त्यात जर काही बिनसले, तर मग दुसऱ्याच्या सोबत फिरायला जातात. परत दुसऱ्यासोबत पण जमले नाही तर मग तिसरा, असे चक्र चालू असते आणि एकावेळी दोन-दोन, चार-चारजणांसोबत सुद्धा फिरतात.

**दादाश्री :** दॅट इज वाईल्डनेस, वाईल्ड लाईफ!(हा तर जंगलीपणा आहे, जंगली जीवन!)

**प्रश्नकर्ता :** तर त्या लोकांनी काय करायला हवे?

**दादाश्री :** मुलीला एका मुलासोबत सिन्सियर (प्रमाणिक) रहायला हवे आणि मुलगा मुलीच्या प्रति सिन्सियर रहायला हवा, असे जीवन असायला हवे. अन्‌सिन्सियर लाइफ ते रोंग लाइफ आहे.

**प्रश्नकर्ता :** आता ह्यामध्ये सिन्सियर कसे राहता येईल? एक-दुसऱ्यांसोबत फिरत असतात, त्यामुळे नंतर मुलगा किंवा मुलगी इन्सिन्सियर होऊन जातात.

**दादाश्री :** अशा वेळी फिरणे बंदच करायला हवे ना! लग्न करुन घ्यायला हवे. आफ्टर ऑल वी आर इंडियन, नोट वाइल्ड लाइफ. (शेवटी आपण भारतीय आहोत, रानटी नाही.)

आपल्या येथे लग्नानंतर दोघे संपूर्ण जीवन सिन्सियरली (प्रमाणिकपणे) रहातात. ज्यांना सिन्सियरली जगायचे असेल, त्यांनी सुरुवातीपासूनच दुसऱ्या व्यक्तिसोबत फ्रेन्डशिप ठेवायची नाही. अशा बाबतीत खूपच कडक राहिले पाहिजे. कोणत्याही मुलासोबत फिरायचे नाही. आणि फिरायचेच असेल तर एकच मुलगा नक्की करुन आई-वडीलांना सांगून टाकायचे की लग्न करणार तर ह्याचा बरोबरच करेन, मला दुसऱ्या कोणाशीही लग्न करायचे नाही. इन्सिन्सियर लाइफ इज वाइल्ड लाइफ. (अप्रमाणिक जीवनच रानटी जवीन आहे)

चारित्र्य वाईट असेल, व्यसनी असेल, अश्या तर खूप अडचणी असतात. व्यसनी आवडतो की नाही ?

**प्रश्नकर्ता :** अजिबात नाही.

**दादाश्री :** आणि चारित्र्य चांगले आहे पण व्यसनी असेल तर?

**प्रश्नकर्ता :** सिगारेटपर्यंत चालवून घेईन.

**दादाश्री :** खरे आहे तुझे. सिगारेटपर्यंत निभावू शकतो. पण त्यानंतर तो ब्रांडीचा पेग भरून पिणार ते कसे निभावायचे? त्याची काही सीमा असते. आणि चारित्र्य तर खूप मोठी वस्तु आहे. तू चारित्र्यला मानते? चारित्र्य पसंत आहे तुला?

**प्रश्नकर्ता :** त्याशिवाय तर जगायचेच कसे?

**दादाश्री :** हो, पहा! हिन्दुस्थानी स्त्रिया! मुली जर एवढे समजतील ना तर काम होऊन जाईल. जर चारित्र्यला समजलात तर काम फत्ते होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** चांगल्या वाचनामुळे आमचे विचार एवढे उंच झाले आहेत.

**दादाश्री :** वाचनाने एवढे चांगले संस्कार मिळाले ना!

बाकी वास्तवात तर हे सर्व दगा-फटका आहे. तुम्हा सगळ्यांना दिसत नाही, मला तर सर्व काही दिसते, केवळ दगाच आहे. आणि दगा दिला

असेल तर तेथे सुख कधीही नसते! म्हणून एकमेकांशी सिन्सियर असायला हवे. लग्नापूर्वी दोघांच्या चूका झाल्या असतील, त्या आम्ही स्विकार करवून देतो. आणि मग एग्रीमेन्ट (करार) करुन देतो की, आता एकमेकांशी सिन्सियर रहायचे. दुसरीकडे पहायचे नाही. जीवनसाथी पसंत असो अथवा नसो, तरी पण सिन्सियर रहायचे. आपली आई आवडत नसेल, तिचा स्वभाव खराब असेल तरी पण तिच्या प्रति सिन्सियर राहतोच ना!

**प्रश्नकर्ता :** संसार व्यवहारात पूर्वी जी कर्मे झाली आहेत, त्याच्या उदयानुसार सर्व चालत असते. त्यात काही कावेबाजी होत असल्याचे माहित पडले की माझ्यापाठी कावेबाजी रचली जात आहे, तर मग अशा परिस्थितीत 'समभावाने निकाल' करण्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** तिरसट पती मिळाला असेल तर त्याला कशाप्रकारे जिंकायचे? कारण की जे प्रारब्धात लिहिले गेले आहे ते तर आपल्याला सोडणार नाही ना! आणि आपल्या मनाप्रमाणे होत नाही असा हा संसार आहे. तर तू मला सांग की 'दादाजी, असा पती मिळाला आहे.' तर मी लगेच तुला ते सर्व रिपेअर करुन देईल आणि तुला चांगले जीवन जगण्यासाठी किल्ली पण देईल.

औरंगाबादला एक मुसलमान मुलगी आली होती. मी तिला विचारले, 'काय नांव आहे तुझे?' तेव्हा ती म्हणाली, 'माझे नांव मशरूर आहे.' मी तिला सांगितले, 'ये, इकडे माझ्या जवळ बैस, कसे येणे केले?' ती आली. आल्यावर तिच्या मनाला बरे वाटले. असे पाहताक्षणी तिला बरे वाटले, आतून शांती वाटली की हे खुदाचे आसिस्टन्ट (सहाय्यक) असल्या सारखे वाटतात. असे वाटल्यावर मग ती बसली. नंतर मग दुसऱ्या गोष्टी निघाल्या.

नंतर मी विचारले,'काय करतेस तू ?' त्यावर ती म्हणाली, 'मी लेक्चरर (व्याखाता) आहे.' मग मी विचारले, 'लग्न-बिग्न केले की नाही केले ?' तर ती म्हणाली, 'नाही लग्न नाही केले, परंतु सगाई (साखरपुडा) झाला आहे.' मी विचारले, 'सगाई कुठे झाली आहे, मुंबईत?' तर ती म्हणाली, 'नाही, पाकिस्तानात' 'लग्न केव्हा करणार आहेस?' तेव्हा म्हणाली, 'सहा महिन्यातच.' मी विचारले, 'कोणासोबत? पती कसा शोधून काढलास?' तर म्हणाली, 'लॉयर आहे (वकील).'

नंतर मग मी तिला विचारले की, 'तो पती झाल्यावर तुला काही दुःख नाही देणार? आता तर तुला कुठल्याही प्रकारचे दुःख नाही आहे पण पती करायला जाशील आणि पतीने दुःख दिले तर?' मी म्हणालो, 'त्याच्या बरोबर लग्न झाल्यानंतर तुझी काही योजना असेल ना की त्याच्या बरोबर कसे वागायचे? की तू योजनाच नाही केलीस? तेथे लग्नांतर काय करायचे त्यासाठी तू काही योजना आखली असेलच ना, की लग्नानंतर त्या लॉयर बरोबर तुझे जमते की नाही याची?' तेव्हा ती म्हणाली, 'मी सगळी तयारी करुन ठेवली आहे. तो असा बोलला तर मी त्याला समोरुन असे उत्तर देईन. तो असे बोलला तर मी असे बोलेल, तो असा म्हणाला तर, अश्या प्रत्येक बाबतीत माझ्या जवळ उत्तरे तयार आहेत.'

जशी रशियाने अमेरिका बरोबर युद्धची तयारी केली होती ना, तशीच तिने पण तयारी करुन ठेवली होती. दोन्हीबाजूनी पुर्ण तयारी. तिने तर मतभेद उभे करण्याचीच तयारी करुन ठेवली होती. तो भांडण करेल त्या अगोदरच ही बॉम्ब फोडणार! त्याने असे पेटवले तर मी पण असे पेटवून देईल. अर्थात् तेथे जाण्याच्या अगोदरच हल्ला करण्यास तयार ना! त्याने असे तीर सोडले तर आपण ह्या बाजूने रॉकेट सोडायचे. मी म्हणालो, 'हे तर तू कोल्डवॉर(शीतयुद्ध) उभे करशील. कधी शमणार हे?' शीतयुद्ध कधी बंद होते का ? हे पहा ना, रशिया-अमेरिकासाररव्या मोठ-मोठ्या साम्राज्यावाद्यांचे सुद्धा बंद होत नाही ना?

ह्या मुली असे सर्व विचार करतात, अश्याप्रकारे त्या सर्व नक्की करतात. ही मुले तर बिचारी भोळी-भाबडी असतात. मुले असे सर्व काही करत नाहीत. आणि त्या परिस्थितीत मग मार खातात, भोळे असतात ना!

हे जे तुम्ही सांगतात ना, कावेबाजी होत असेल तर काय तयारी करुन ठेवायला हवी? परंतु त्यामुलीने संपूर्ण तयारी करुन ठेवली होती, बोम्बार्डिंग केव्हा आणि कशी करायची! तो असा बोलला तर असा अटॅक, तसा बोलला तर असा अटॅक(आक्रमण) 'संपूर्ण तयारी करुन ठेवली आहे असे सांगितले!' मग मी मधेच तिला विचारले, 'हे सर्व तुला कोणी शिकवले? घरातून हाकलून लावेल आणि तलाक (घटस्फोट) देईल !' घटस्फोट देईल की नाही देणार? मी सांगितले की याप्रमाणे तर सहा महिन्यात घटस्फोट

होईल, तुला घटस्फोट हवा आहे? ही पद्धत चुकीची आहे. नंतर मी तिला सांगितले, 'तुझा घटस्फोट होऊ नये त्यासाठी मी तुला हे सर्व शिकवतो'

त्यावर मला सांगते, 'दादाजी मी असे करू नको तर मग काय करू? नाही तर तो मला दाबून टाकेल.' मी सांगितले, 'तो काय तुला दाबून टाकेल? बिचारा लॉयर!

नंतर मग मी विचारले, 'ताई, माझे सांगितलेले स्विकारशील? तुला सुखात रहायचे आहे की दु:खात? बाकी ज्या स्त्रिया सर्व तयारी करुन पतीकडे गेल्यात, त्या शेवटी दु:खी झाल्यात. तू माझ्या सांगण्याप्रमाणे जा, कोणत्याही तयारीशिवाय जा.' मग तिला सर्व काही समजावले.

घरात दररोज क्लेश होईल तर वकील म्हणेल, 'जळो, हिला सोडून हिच्याऐवजी दुसरी आणतो.' त्यामुळे मग हे टिट फॉर टॅट (जशास तसे) होईल. जेथे प्रेमाचे सौदे करायचे आहेत, तेथे असे कश्यासाठी? सौदे कशाचे करायचे आहेत?

**प्रश्नकर्ता :** प्रेमाचे.

**दादाश्री :** प्रेमाचे. भले आसक्तियुक्त असो पण प्रेमा सारखे आहे ना ! त्याच्यावर द्वेष तर होत नाही ना ! मी सांगितले, 'असे नाही करायचे, तू सुशिक्षित आहेस म्हणून अशी तयारी करुन ठेवली आहेस? हे तर वॉर (लढाई) आहे? हे काय हिन्दुस्थान आणि पाकिस्तानची लढाई आहे? जगामध्ये सर्व हेच करत आहेत. ही मुले-मुली सगळे हेच करत आहेत. त्यामुळे तर दोघांचेही जीवन बिघडते.' नंतर मी तिला सर्व प्रकारे समजावले.

पतीसोबत अशाप्रकारे वर्तन करायला हवे. अशाप्रकारे म्हणजे तो तिरसटपणे वागत असेल तर तु सरळ वाग. त्याचे समाधान व्हायला हवे, मार्ग काढायला हवा. त्याला भांडण करायचे असेल तरी आपण एकता ठेवायला हवी. तो सारखे वेगळे होण्याची भाषा करीत असेल तरी त्या परिस्थितीत सुद्धा आपण सांगायचे की आपण एकच आहोत. कारण की, हे सर्व रिलेटिव संबंध आहेत. त्याने संबंध तोडले आणि आपण ही संबंध तोडले तर लगेच संबंध तुटून जातील. म्हणजे तो तलाक देऊन टाकेल.

तेव्हा म्हणाली, 'मी काय करायचे?' मी तिला समजावले, 'त्याचा मूड पाहून व्यवहार करायला हवा, जेव्हा त्याचा मूड ठीक नसेल तेव्हा आपण मनातल्या मनातच 'अल्ला' चे नामस्मरण करायचे आणि मूड ठीक असेल तेव्हा त्याच्याशी बातचीत करायची. तो मूडमध्ये नसेल आणि तू त्याची खोड काढलीस तर भडका उडेल.'

तू त्याला निर्दोष च पहायचे. तो तुला उलट-सुलट बोलला तरी पण तू शांत रहायचे. खरे प्रेम असायला हवे. आसक्तिमध्ये तर सहा-बारा महिन्यात सर्व तूटुनच जाईल. प्रेमात सहनशीलता असायला हवी, एडजस्टेबल (समाधानी) असायला हवे.

तर अशी शिकवण मशरूरला दिली. मी सांगितले, 'तू काहीही करायचे नाही, त्याने जरी समोरुन तुझ्यावर तीर चालवले तरीही आपण आपली स्थिरता ठेवून 'दादा, दादा' करीत रहायचे. तू एकपण तीर फेकू नकोस.' मग मी विधि करुन दिली.

नंतर तिला विचारले की, 'तुझ्या घरी कोण कोण आहेत?' तेव्हा म्हणाली, 'माझी सासू आहे.' मी विचारले, 'सासू बरोबर कशी एडजस्टमेन्ट करणार?' तेव्हा म्हणाली, 'सासुला तर माझा इंगा दाखवेल.'

नंतर मी तिला समजावले. मग ती म्हणाली, 'हो, दादाजी, तुम्ही सूचवलेल्या सर्व गोष्टी मला पटल्यात.' तू अशाप्रकारे वागशील तर तलाक देणार नाही आणि सासूसोबत पण जूळून राहिल. नंतर मग तिने मला एक चंदनाचा हार घातला. मी सांगितले, 'हा हार तू घेऊन जा आणि तुझ्या सोबत ठेव, हाराचे दर्शन करुन पतीसोबत आपला व्यवहार करत जा, तर सर्व खूप छान चालेल. तिने तो हार आजसुद्धा आपल्या सोबत सांभाळून ठेवला आहे.'

तिला चारित्र्यबळाच्या बाबतीत सांगितले होते की पती काहीही बोलेल, तुझ्यासोबत कसेही वागेल, तेव्हा तू फक्त मौन धारण करुन, शांतपणे पाहत रहाशील तर तुझ्यात चारित्र्यबळ उत्पन्न होईल आणि त्याचा प्रभाव पडेल, वकील असला तरीही. तो कसाही रागावला, 'दादा' चे नांव घ्यायचे आणि स्थिर रहायचे. तेव्हा त्याला वाटेल की कशी स्त्री आहे ही! ही तर हरतच नाही. नंतर मग तो स्वतः हरेल. मग तिने असेच केले,

मुलगीच तशी होती. दादासारखे शिकवणारे भेटले तर मग काय बाकी राहिले ? नाहीतर या पूर्वी एडजस्टमेन्ट रशिया आणि अमेरिका सारखे होते. तेथे बटन दाबताच चुटकी सरशी सर्व पटापट पेटेल, असे होते. ही काय मानवता आहे? कशाला घाबरतात? जीवन कशासाठी असते? जेथे संयोगच असे आहेत, तेव्हा मग काय करणार?

जे जिंकण्यासाठी तयारी करतात ना, तेथे त्यांचे चारित्र्यबळ 'लूज' (कमकुवत) होते. आम्ही अशी कोणत्याही प्रकारची तयारी करत नाही. या चारित्र्याचा उपयोग, ज्याला तुम्ही तयारी म्हणतात, परंतु त्यामुळे तुमच्यात जे चारित्र्यबळ आहे ते 'लूज' होऊन जाते आणि जर चारित्र्यबळ नष्ट झाले, तर तुझ्या पती समोर तुझी किंमतच रहाणार नाही. अशाप्रकारे त्या मुलीमध्ये योग्य समझ चांगल्या प्रकारे बिंबवली. नंतर मग ती मला म्हणाली की 'दादाजी, आता मी कधीही हरणार नाही, अशी गॅरेंटी देते.'

आपल्याशी कोणी कावेबाजी (कट-कारस्थान) करत असेल आणि आपणही तसेच केले तर आपले चारित्र्यबळ तुटून जाईल. कोणी कितीही कावेबाजी करत असेल तरी स्वत: केलेल्या कावेबाजीत तो स्वत:च फसतो. परंतु जर तुम्ही त्या कावेबाजी समोर तयारी करायला गेलात तर तुम्ही सुद्धा त्यात फसाल. आमच्यापाठी सुद्धा बऱ्याच लोकांनी कावेजाबी केली होती परंतु त्यात ते स्वत:च फसेल गेलेत. कारण की आम्हाला एक क्षणभरही कावेबीजी करण्याचा विचार आले नाहीत. जर असे समोर तयारी करण्याचे विचार आले तर आमचेही चारित्र्यबळ तुटून जातो. शीलवानपणा तुटून जाते.

शीलवान म्हणजे काय? की समजा तो शिवीगाळ करायला आला असेल परंतु येथे आल्यावर शांतपणे बसतो. आम्ही सांगितले काहीतरी बोला, बोलाना, परंतु तो एक अक्षरसुद्धा बोलू शकत नाही. असा 'शीलचा' प्रभाव आहे! जर आपण एक अक्षर पण समोर बोलण्याची तयारी केली ना, तर शील तुटून जाईल. म्हणून तयारी करायची नाही. ज्याला जे करायचे असेल ते त्याने करावे. 'सर्वत्र मीच आहे.' बोला. (आत्मास्वरूपाने सर्वांच्या सोबत अभेद आहे.)

समोर तयारी करण्यास गेलो तर आपल्याला नवीन कावेबाजी करावी

लागते आणि नंतर मग आपण स्लिप होतो (घसरतो). आता आपल्याकडे ते हत्यारच नाही आहे ना! त्याच्याकडे तर ते हत्यार आहे, म्हणून भले तो वापरो! परंतु 'व्यवस्थितशक्ति' आहे ना! म्हणून शेवटी त्याचे हत्यार त्याच्यावरच पलटते, अशी 'व्यवस्थितशक्ति' आहे!!

तिला सर्व समज आत फिट होऊन गेली. दादाजींनी ड्रॉईंग करुन दिली. मला म्हणाली, 'अशी ड्रॉईंग सांगायची होती का?' मी सांगितले, 'होय असे ड्रोईंग.'

मानले पाहिजे या मुलीला! मग त्या मुलीने तिच्या आई-वडीलांना हे सर्व सांगितले. ते ऐकून तिचे वडील जे डॉक्टर होते, ते दर्शन करायला आले.

पहा, दादाजींना काही वेळ लागतो का ? मशरूर सारखे येथे यायला हवेत! आली तर ऑपरेशन होऊन गेले झटपट! पहा, तेथे सारखी दादाजी, दादाजी, म्हणून दररोज आठवण करते ना!

सर्वांचे काम होऊन जाईल. आमचे एक-एक शब्द त्वरित समाधान करणारे आहेत. ते शेवटी मोक्षपर्यंत घेऊन जातात! तुम्ही फक्त 'एडजस्ट एवरीव्हेर' करत रहा.

## १९. जगामध्ये सुखाची साधना, सेवेने

जी व्यक्ति आई-वडीलांचे दोष पहाते, त्याची कधीही उन्नती होत नाही. झाला तर पैसेवाला होईल, परंतु त्याची आध्यात्मिक उन्नती कधीही होत नाही. आई-वडीलांचे दोष पहायचे नाहीत. त्यांचे उपकार तर कसे विसरू शकतो? कोणी चहा पाजला असेल तरी सुद्धा त्याचे उपकार विसरू शकत नाही, तर मग आपण आई-वडीलांचे उपकार कसे विसरू शकतो?

तुला समजले का? हो..., अर्थात् तुला त्यांचे खूप उपकार मानले पाहिजेत, आई-वडीलांची खूप सेवा करायला पाहिजे. ते उलट-सुलट बोलले तरीही आपण लक्ष द्यायला नको. ते भले उलट-सुलट बोलले पण आपण दुर्लक्ष करायचे कारण ते मोठे आहेत ना! की मग तुला पण त्यांना उलट-सुलट बोलायला हवे का?

**प्रश्नकर्ता :** असे नाही बोलायला पाहिजे, परंतु बोलून टाकतो त्याचे काय? मिस्टेक होऊन जाते तर काय?

**दादाश्री :** हो, मग घसरून का पडत नाही? कारण की, तेथे सावध रहातात आणि त्यातून घसलास तर वडील पण समजून जातात की बिचारा घसरून पडला. हे जर तू जाणून-बुजून असे करायला गेला तर 'तू येथे कसा घसलास?' त्याचे उत्तर मी मागितले. तर ते बरोबर आहे की चुकीचे? शक्यतो आपल्याकडून तसे व्हायला नको, त्यातून जर तुझ्याने तसे काही होऊन गेले तर सगळे समजून जातील की नाही, हा असे करणारा नाही आहे.

आई-वडीलांना खुश ठेवायचे. ते तुला खुश ठेवायचा प्रयत्न करतात की नाही ? त्यांना सुखी करावे असे तुला वाटत नाही का?

**प्रश्नकर्ता :** होय, वाटते ना! परंतु दादाजी, मला असे वाटते की त्यांना कटकट करण्याची सवयच झाली आहे.

**दादाश्री :** होय, पण त्यात तुझीच चुक आहे, म्हणून तर आई-वडीलांना दुःख झाले, त्याचे प्रतिक्रमण करायला हवे. त्यांना दुःख तर व्हायला नको, 'मी सुख द्यायला आली आहे' असे तुझ्या मनात व्हायला हवे. 'माझी अशी काय चुक झाली की आई-वडीलांना दुःख झाले' असे आतून वाटले पाहिजे.

वडील वाईट आहे असेतर वाटत नाही ना? आणि जर असे वाटले तर काय करशील ? खरे तर वाईट असे या जगात काहीच नाही. आपल्याला जे मिळाले त्या सर्व चांगल्याच वस्तु असतात. कारण आपल्या प्रारब्धाने मिळतात. आई मिळाली, ती पण चांगली. कितीही काळीकूट्ट असो, तरी पण आपली आई चांगलीच आहे. जी आपल्याला प्रारब्धाने मिळाली ती चांगली. तिला बदलून दुसरी आणू शकतो का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** बाजारात दुसरी आई विकत मिळत नाही? आणि मिळाली तरी ती काय कामाची? गोरी आई आवडली तरी पण

आपल्यासाठी काय कामाची? आता जी आहे ती चांगली. दुसऱ्यांची गोरी आई पाहून, 'आपली आई वाईट आहे' असे नाही बोलायचे. 'माझी आई तर खूपच छान आहे' असे बोलायला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** वडीलांचे काय ऐकायला पाहिजे ?

**दादाश्री :** वडीलांचे? ज्याच्यामुळे ते राजी-खुषी रहातील असा व्यवहार त्यांच्याशी ठेवायचा. त्यांना राजी ठेवता येत नाही का? ते राजी-खुशी रहातील असे करा.

आई-वडील ते आई-वडीलच. ह्या जगात सर्व प्रथम सेवा करण्यायोग्य जर कोण असेल तर ते आई-वडील आहेत. त्यांची सेवा करशील?

**प्रश्नकर्ता :** होय दादाजी, सेवा चालूच आहे. घर कामात मदत करतो.

**दादाश्री :** शांतीचे काय करशील? जीवनात शांती आणायची आहे की नाही आणायची?

**प्रश्नकर्ता :** शांती आणायची आहे.

**दादाश्री :** तर शांति आणून देईल, पण कधी आई-वडीलांची सेवा केली का? आई-वडीलांची सेवा करशील तर शांती जाणार नाही. परंतु आज-काल मनापासून आई-वडीलांची सेवा करत नाही. मुलगा पंचवीस-तीस वर्षाचा झाला आणि 'गुरू' (पत्नी) आली, ती सांगते की मला नवीन घरी घेऊन चला. तुम्ही गुरू पाहिला आहे का ? पंचवीस-तीस वर्षाच्या वयात 'गुरू' भेटून जातो आणि 'गुरू' भेटल्यावर सर्व काही बदलते. गुरू सांगते आईंना तुम्ही ओळखतच नाही. सुरूवातीला तर तो लक्ष देत नाही. सुरूवातीला तर ऐकले न ऐकल्या सारखे करतो, परंतु दोन-तीनदा सांगितल्यावर मग हळू हळू तिच्याच बाजूने होतो.

आई-वडीलांची जर शुद्धभावनेने सेवा केली तर त्याला कधी अशांती होत नाही असे हे जग आहे. हे जग काही दुर्लक्ष करण्यासारखे नाही. म्हणून तर जगातील विचारतात की मुलाचाच दोष आहे ना! मुले आई-वडीलांची

सेवा करत नाही, त्यात आई-वडीलांचा काय दोष? मी म्हणतो, 'त्यांनी त्यांच्या आई-वडीलांची सेवा केली नव्हती, म्हणून त्यांना सेवा मिळत नाही.' अशी परंपराच चुकीची आहे. आता जुन्या परंपरेला बाजूला सारुन नवीन सुरुवात केली तर उत्तम ठरेल.

वडीलधाऱ्यांची सेवा केल्याने आपले विज्ञान विकसित होत जाते. मूर्तीची सेवा करू शकता का? मूर्तीचे काय पाय दु:खतात? सेवा तर पालक, वडीलधारी किंवा गुरूजन असतील, त्यांची करायची असते.

आई-वडीलांची सेवा करणे हा धर्म आहे. हिशोब कसाही असो पण सेवा करणे आपला धर्म आहे. आपला सेवा धर्म जेवढा पाळणार, तेवढे सुख आपल्याला मिळेल. वडीलधाऱ्यांची सेवा तर होईलच, परंतु त्यासोबत आपल्याला सुख पण प्राप्त होईल. आई-वडीलांना सुख दिले तर आपल्याला सुख मिळेल. वडीलधाऱ्यांची सेवा करणारा मनुष्य तर कधीच दु:खी होत नाही.

एक भाई मला एका मोठ्या आश्रमात भेटलेत. मी त्यांा विचारले, 'तुम्ही येथे कसे ?' तेव्हा त्यांनी सांगितले, 'मी या आश्रमात गेल्या दहावर्षापासून रहात आहे.' तेव्हा मी त्यांना सांगितले, 'तुमचे आई-वडील उतारवयात गावी गरीबीत खूपच दु:खी आहेत.' तेव्हा तो म्हणाला, 'त्यात मी काय करू? मी त्यांच्याकडे लक्ष दिले, तर माझा धर्म राहून जाईल.' याला धर्म कसे म्हणणार? धर्म तर, जो आई-वडीलांची काळजी घेतो, भावांना बोलवतो, सगळ्यांना बोलवतो त्यास धर्म म्हणावा. व्यवहार आदर्श असायला हवा. जो व्यवहार स्वत:च्या धर्माचा तिरस्कार करतो, आई-वडीलांच्या संबंधाला पण धुत्कारतो, त्यास धर्म कसे म्हणू शकतो?

मी पण आईची सेवा केली होती. तेव्हा मी वीस वर्षाचा होतो. तरुणवयात आईची सेवा केली होती. वडीलांना खांदा दिला होता, त्यांची एवढीच सेवा झाली होती. नंतर हिशोब समजून गेलो की अरे, असे कित्येक वडील मागच्या जन्मी होऊन गेलेत. तर आता काय करणार? उत्तर मिळाले, 'जे आहेत त्यांची सेवा करा.' मग जे गेले ते गेलेत. परंतु आता जे आहेत त्यांची सेवा करा. जर असे कोणी असतील तर ठीक, नसेल तर चिंता करू

नका. असे तर खूप होऊन गेलेत. आता जे आहेत त्यांची सेवा करा. आई-वडीलांची सेवा ही प्रत्यक्ष आहे. भगवंत दिसतात का? भगवंत तर दिसत नाही, पण हे आई-वडील तर दिसतात.

आता जास्तीत जास्त जर कोणी दुःखी असतील तर ६५ वर्ष (आणि त्याहून अधिक) वयाची माणसं खूप दुःखी आहेत. परंतु ते कोणाला सांगतील? मुले लक्ष देत नाहीत. जुन्या पिढीत आणि नव्या पिढीत मोठी दरी निर्माण झाली आहे. म्हातारा जुन्या पद्धती सोडत नाही, मार खातो तरी सुद्धा सोडत नाही.

**प्रश्नकर्ता :** प्रत्येकाचे वय ६५ वर्षाचे झाल्यावर हेच हाल होत असतात ना?

**दादाश्री :** होय, असेच हाल होतात. असेच्या असे हाल! म्हणून ह्या काळात वास्तवात करण्यासारखे काय आहे? एखाद्या ठिकाणी ह्या वडीलधाऱ्यांसाठी राहण्याची व्यवस्था केली असेल तर अति उत्तम. असा मी विचार केला होता. नंतर आम्ही विचार केला की असे काही केले असेल, तर आधीच त्यांना आमचे हे 'ज्ञान' द्यायचे, मग त्यांच्या खाण्या-पिण्याची व्यवस्था तर दुसऱ्या सामाजिक संस्थांकडे सोपविले तरी चालेल. परंतु ज्ञान दिलेले असेल तर मग दर्शन करत राहिलेत तरी पण काम चालेल! हे ज्ञान दिले असेल तर बिचाऱ्यांना शांति राहिल, नाहीतर कशाच्या आधारे शांती राहिल? तुम्हाला काय वाटते?

आता तुमच्या घरातील मुलांवर संस्कार कसे घडून येतील? तुम्ही तुमच्या आई-वडीलांना नमस्कार करा. ह्या वयात तुमचे केस पांढरे झाल्यावर पण तुम्ही तुमच्या आई-वडीलांना नमस्कार करीत असाल तर मुलांच्या मनामध्ये पण असे विचार येतील की पप्पा लाभ घेतात तर आम्ही का लाभ घेऊ नये? तेव्हा मग तुम्हाला नमस्कार करतील की नाही?

**प्रश्नकर्ता :** आज-कालची मुले आई-वडीलांना नमस्कार करीत नाहीत. त्यांना संकोच वाटतो.

**दादाश्री :** असे आहे, आई-वडीलांना नमस्कार का करत नाही?

तर आई-वडीलांचे दोष (चूका) मुलांना दिसून येतात. त्यामुळे 'आई-वडील नमस्कार करण्यायोग्य नाहीत' असे ते मानतात, म्हणून तर ते नमस्कार करत नाहीत. जर आई-वडीलांचे विचार व आचरण ऊंच, बेस्ट वाटले तर ते नमस्कार करतीलच. परंतु आज-कालचे आई-वडील तर मुले समोर ऊभी असताना सुद्धा भांडतात. आई-वडील भांडतात की नाही भांडत? अशा परिस्थितीत मुलांच्या मनामध्ये आईं-वडीलांसाठी असलेला आदर कसा राहिल?

ह्या जगात तीन व्यक्तींचे फार मोठे उपकार असतात. ते उपकार विसरण्यासारखे नाहीत. त्या व्यक्ती आहेत आई-वडील आणि गुरू. ज्यांनी आपल्याला चांगल्या आणि योग्य मार्गाला लावले, ह्या तिघांचेही उपकार कधीही विसरूच शकत नाही.

**जय सच्चिदानंद**

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार

**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे, पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421. फोन : (079) 39830100, E-mail : info@dadabhagwan.org

**अहमदाबाद** : **दादा दर्शन**, ५, ममतापार्क सोसाइटी, नवगुजरात कॉलेजच्या मागे उस्मानपुरा, अहमदाबाद-380014. फोन : (079) 27540408

**वडोदरा** : **दादा मंदिर**, १७, मामाची पोल-मुहल्ला, रावपुरा पुलिस स्टेशन समोर, सलाटवाड़ा, वडोदरा. फोन : 9924343335

**गोधरा** : **त्रिमंदिर**, भामैया गाँव, एफसीआई गोडाउन समोर, गोधरा (जि.-पंचमहाल). फोन : (02672) 262300

**राजकोट** : **त्रिमंदिर**, अहमदाबाद-राजकोट हाईवे, तरघड़िया चोकड़ी (सर्कल), पोस्ट : मालियासण, जि.-राजकोट. फोन : 9924343478

**सुरेन्द्रनगर** : **त्रिमंदिर**, लोकविद्यालय जवळ, सुरेन्द्रनगर-राजकोट हाईवे, मुळी रोड.

**मोरबी** : **त्रिमंदिर**, पो-जेपुर (मोरबी), नवलखी रोड, ता-मोरबी, जि-राजकोट, फोन : (02822) 297097

**भुज** : **त्रिमंदिर**, हिल गार्डनच्या मागे, एयरपोर्ट रोड. फोन : (02832) 290123

| | | | |
|---|---|---|---|
| **मुंबई** | : 9323528901 | **दिल्ली** | : 9810098564 |
| **कोलकता** | : 9830006376 | **चेन्नई** | : 9380159957 |
| **जयपुर** | : 8290333699 | **भोपाल** | : 9425024405 |
| **इन्दौर** | : 9039936173 | **जबलपुर** | : 9425160428 |
| **रायपुर** | : 9329644433 | **भिलाई** | : 9827481336 |
| **पटना** | : 9431015601 | **अमरावती** | : 9422915064 |
| **बेंगलूर** | : 9590979099 | **हैदराबाद** | : 9989877786 |
| **पूणे** | : 9422660497 | **जालंधर** | : 9814063043 |

**U.S.A.** : **(D.B.V. I.)** +1 877-505-DADA (3232)

| | | | |
|---|---|---|---|
| **U.K.** | : +44 330-111-DADA (3232) | **UAE** | : +971 557316937 |
| **Kenya** | : +254 722 722 063 | **Singapore** | : +65 81129229 |
| **Australia** | : +61 421127947 | **New Zealand** | : +64 210376434 |

**Website : www.dadabhagwan.org**



## रागावून नाही, प्रेमाने सुधरवा

आई-वडील मुलांना सुधारण्यासाठी सर्व काही फ्रेक्चर करुन (तोडून) टाकतात. आपण मुलांसाठी भावना करत रहायचे की मुलांना सद्बुद्धि प्राप्त होवो. असे करता करता कित्येक दिवसानंतर त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहणार च नाही. ते तर हळू हळू समजतील. तुम्ही भावना करत रहा. मुलांवर जोर-जबरजस्ती कराल तर ते उल्टे चालतील. आणि मुलांना कधीही मारु नका. काही चुकभूल झाली असेल तर हळूवार डोक्यावर हात फिरवून त्यांना समजावण्याची जरुरी आहे. प्रेम दिले तर मुले समंजस होतात. तात्पर्य हेच की हा संसार जेमतेम करुन निभावून घेण्यासारखा आहे.

- दादाश्री.

dadabhagwan.org

ISBN 978-93-82128-60-1

Printed in India

Price ₹ 25